शरत्-साहित्य माला–११

# माधवी

[ डॉ. शरच्चंद्र चतर्जींच्या 'बडी दिदी' या मूळ बंगाली कादंबरीवरून

: संपादक :

भा. वि. वरेरकर

: अनुवादक :

पु. बा. कुळकर्णी

: प्रकाशक :

नवभारत प्रकाशन संस्था, मुंबई ४.

# १

या जगांत अशा प्रकारचीं कांहीं माणसं आहेत कीं ज्यांची तुलना गवताच्या जाळाशीं करावी लागेल. गवताच्या जाळासारखींच तीं एकदम भडकून उठतात आणि तितक्याच लवकर निवूनही जातात. तो जाळ पेटता ठेवण्यासाठीं जशी जरूर पडेल तसं वेळोवेळीं गवत टाकण्यासाठीं कुणीना कुणीतरी माणूस सदोदीत त्यांच्या मागं असावं लागतं.

गृहस्थाघरच्या मुली मातीच्या पणत्या लावायच्या वेळीं तेल आणि वात घालतांना शेजारीं एक लहानशी काटकी ठेऊन देतात. पणतींतील ज्योत मंदावत आली कीं या छोट्या काटकीनं ती सारावी लागते—तशी वात सारली नाहीं तर तेल आणि वात असूनही दिवा पेटता राहूं शकत नाहीं.

सुरेंद्रनाथाचा स्वभाव कांहींसा अशा प्रकारचा होता. त्याच्या ठायीं बल, बुद्धि, आत्मविश्वास सर्व कांहीं होतं—पण तो कोणतंही काम तडीला न्यायला एकट्यानं समर्थ होत नसे. मोठ्या उत्साहानं एकाद्या कामाला तो सुरवात करी—आणि तितक्याच आळसानं तें काम मुकाट्यानं सोडून देऊन अगदीं स्वस्थ बसून राही. अशाच वेळीं कुणातरी दुसऱ्या माणसाची जरूर असे, ती ती वात सारण्यासाठीं.

सुरेंद्राचा बाप पश्चिम बंगालमधील एका दूरच्या गांवीं वकिली

करीत असे. प्रत्यक्ष बंगाल प्रांताशीं त्याचा फारसा संबंध नव्हता. याच ठिकाणीं सुरेंद्र विसाव्या वर्षी एम्. ए. झाला, तो कांहींसा स्वतःच्या गुणानं तर कांहींसा त्याच्या सावत्र आईच्या कर्तबगारीनं.

ही त्याची सावत्र आई सारखी त्याच्या पाठीशीं असे, त्यामुळं स्वतःची स्वतःवर किती सत्ता आहे हें त्याला केव्हां केव्हां मुळींच कळत नसे. सुरेंद्र नांवाचा कुणीतरी स्वतंत्र जीव या जगांत मुळीं नव्हताच. माणसाचा आकार धारण करून तो जें कांहीं कामधाम, निजणं उठणं, लिहणं वाचणं, परीक्षा पास होणं वगैरे गोष्टी करीत असे, त्या साऱ्या या सावत्र आईच्या इच्छेच्या जोरावर.

स्वतःच्या मुलाच्या बाबतींत ही त्याची सावत्र आई जरी कांहींशी उदासीन असली तरी सुरेंद्राच्या हालचालीवर मात्र तिची करडी नजर असे. त्याचं थुकणं खाकरणं सुद्धां तिच्या दृष्टीआड होणं शक्य नसे.

या कर्तव्यपरायण स्त्रीच्या जरबेखालीं सुरेंद्र चांगला लिहितावाचता झाला—सुशिक्षित झाला—पण आत्मविश्वास कांहीं शिकला नाहीं. त्याचा स्वतःवरच विश्वास नव्हता. कोणतंही काम यथार्थ आणि पूर्णत्वानं आपल्याला करतां येईल असं त्याला केव्हांच वाटत नसे. आपल्याला केव्हां काय पाहिजे आणि आपण केव्हां काय केलं पाहिजे हें कळण्यासाठीं त्याला दुसऱ्याच्या तोंडाकडे सर्वस्वी पहावं लागे. आपल्याला झोंप येते आहे कीं भूक लागली आहे हें सुद्धां त्याला केव्हां केव्हां निश्चितपणें ठरवतां येत नसे.

कळूं लागल्यापासून हीं पंधरा वर्षं या सावत्र आईवर विसबून त्यानं काढलीं होतीं. अर्थात त्याच्यासाठी तिला किती तरी खटपटी कराव्या लागत होत्या. चोवीस तासांतले बावीस तास ओरडणं आरडणं, हुकूम

करणं, टाकून बोलणं, तोंड वेंगाडणं वगैरे प्रकारांप्रमाणेंच, परिक्षेच्या वर्षीं पूर्वींपासूनच त्याला सारी रात्र जाग ठेवण्यासाठीं तिला स्वतःला झोंपेवर पाणी सोडावं लागे. सवतीच्या मुलासाठीं कधी कुणी एवढं केलंय ! म्हणूनच शेजारपाजारचे सारे लोक रायबाबूंच्या पत्नीची तोंड-फाटेपर्यंत स्तुति करीत असत.

अगदीं जीव तोडून सुरेंद्राला वागवण्यांत ती कसूर करीत नसे. केव्हां ती त्याला टाकून बोलली आणि त्यामुळ त्याचा चेहरा गोरामोरा झाला तर तो तें लक्षण तापाच आहे असं ठरवून तीन दिवसपर्यंत त्याला साबूदाण्याच्या पेजेवर राहायला भाग पाडी.

सुरेंद्राच्या मानसिक उन्नतीकडेही ती शिक्षणदृष्टया मोठी कडक नजर देत असे. तो जरा झकपक कपडे वापरूं लागला, किंवा आधुनिक धर्तीचे कपडे करतो आहे असं तिला दिसून आलं, तर त्याचा हा शिष्टपणा वाढत असल्याचं चट्कन् तिच्या नजरेला येई आणि ती त्याच क्षणाला पुढ दोनतीन आठवडेपर्यंत त्याचे कपडे परटाकडे न देण्याचा हुकूम सोडी.

अशाप्रकारें सुरेंद्राचं आयुष्य वाढत होतं. या प्रेमळ जरबीच्या खालीं केव्हां केव्हां त्याला आपलं जीवन दुःसह होऊन जाई. केव्हां केव्हां त्याला वाटे, सर्वांच्या जीवनाचा आरंभकाल अशाच प्रकारें जात असावा—पण केव्हां तरी आसपासचीं माणस या बाबतींत त्याचा हा गैरसमज दूर करून देऊन जात असत.

एके दिवशीं असच झालं. त्याच्यासारखा बुद्धिमान मुलगा जर विलायतला गेला तर पुढें तो नांवलौकिकाला चढेल अशी एक कल्पना कुणीतरी त्याच्या डोक्यांत भरवून दिली. विलायतेहून परत स्वदेशीं

आल्यावर पुष्कळ लोकांच्या उपयोगी पडतां येईल अस सांगितलं, तेव्हां सुरेंद्रालाही तें एकंदरीत पटलं.

जंगलांतल्या पक्ष्यांपेक्षां पिंजऱ्यांतल्या पक्ष्यांचीच धडपड जास्त असतें. त्यानं कल्पना करून पाहिली. थोडीशी मोकळी हवा, थोडासा स्वतंत्रतेचा प्रकाश त्याच्या नजरेसमोर आला. त्यासरशीं त्याचा पराधीन प्राण बेफाम होऊन पिंजऱ्याच्या चारी बाजूला धडपड करीत भिरभिरूं लागला.

आपल्याला विलायतेला पाठवण्याची कांहींतरी तजवीज व्हावी अशी त्यानं बापापाशीं येऊन मागणी केली. त्यांत पुढ आपला नांवलौकिक होईल असं सांगितलं.

बाप म्हणाला—'पाहू विचार करून!' पण आईचा मनसुबा एकदम प्रतिकूल पडला. बापलेकाच्या मध्यें येऊन ती एवढ्या मोठ्यानं खदखदा हंसली, कीं दोघेही स्तभित होऊन गेले. ती म्हणाली, "तर मग मलाही विलायतेला पाठवायची तयारी करा—नाहीं तर याला तिथं संभाळणार कोण? केव्हां काय खायचं नी केव्हां काय नेसायचं हें सुद्धां ज्याला माहित नाहीं त्याला विलायतेला एकटा पाठवायचा कसा? तबेल्यांतल्या घोड्याला विलायतेला पाठवण आणि याला पाठवणं दोन्हींहीं सारखींच. आपल्याला भूक लागली आहे कीं झोप हवी आहे हें तरी त्या घोडेगुरांना कळतं. तुमच्या सुरूला ते सुद्धां कळत नाहीं—" पुनः एकदां ती मोठमोठ्यानं खदखदां हंसली.

या तिच्या हंसण्याच्या बेफामपणामुळं रायमहाशय अगदींच शरमिंदे झाले. एवढ्या अचुक मुद्दयापुढें युक्तिवाद करणं शक्य नाहीं असेंच सुरेंद्रनाथाला वाटलं. विलायतला जायची आशा त्यानं सोडून दिली.

त्याच्या स्या मित्राला ही हकीकत ऐकून मोठं दुःख झालं. विलायतेला जायचा दुसरा एकादा उपाय होता कीं नाहीं हेंही त्याला सांगतां येईना—पण शेवटीं तो म्हणाला, "असं परस्वाधीन होऊन राहण्यापेक्षां भिक्षा मागणं फार चांगलं. एवढ्या ऑनर्ससह जो एम्. ए. झाला आहे त्याला पोटभर अन्न मिळण्यासाठीं कांहीं वळवळावं लागणार नाहीं हे निश्चित!"

घरीं आल्यावर सुरेंद्र या बाबतींत विचार करूं लागला. विचार करतां करतां त्याला असं दिसून आलं, कीं मित्रानं सांगितलं तेंच खरं—भीक मागून खावं हेंच उत्तम! सारेच कांहीं विलायतेला जात नाहींत. पण असलं जीवित अगदीं मर्तुकडं असलं तरीही साऱ्यानांच कांहीं जन्मभर असंच मरावं लागत नाहीं.

एके दिवशीं ऐन रात्रीं तो स्टेशनवर आला आणि कलकत्त्याचं तिकीट काढून गाडींत बसला. बापाला पत्र लिहून त्यानं कळवलं—कांहीं दिवसापुरतं आपण घर सोडून निघालों आहें. उगीच आपली चौकशी करण्यांत कांहीं अर्थ नाहीं आणि कदाचित आपला पत्ता लागलाच तर आपण घरीं परत येईन असाही फारसा संभव नाहीं.

तें पत्र रायमहाशयांनी आपल्या पत्नीला दाखवलं. ती म्हणाली, "सुरु आतां माणसांत आलाय, विद्या मिळाली—पंख फुटूं लागले—यावेळीं उडून जायचा नाहींतर जायचा केव्हां?"—

तरीही त्यांनी चौकशी सुरू केली. कलकत्त्यांतल्या साऱ्या ओळखीच्या माणसांना पत्रं लिहिलीं पण त्याचा कांहीच उपयोग झाला नाहीं. सुरेंद्राचा पत्ता लागला नाहीं.

---

# २

माणसांनीं गजबजलेल्या कलकत्त्याच्या राजरस्त्यांत येऊन पडणं सुरेंद्रनाथला मोठं कठीण गेलं. इथ त्याच्या अंगावर ओरडायला कुणी नव्हतं. सारा दिवस त्याला शिकवणींत ठेवायचीही कुणाला जरुरी नव्हती. तोंड उतरलं तर कोण त्याच्याकडे वळून पहात नसे कीं चेहरा फुल्ला तरी तो कुणाच्या लक्षांत येत नसे. इथं स्वत.चीं काळजी स्वत: घेणं भाग होतं. इथं भिक्षा मिळत होती, दयेला जागा होती, आश्रयाला वाव होता, पण त्यासाठीं स्वतःचा प्रयत्न पाहिजे होता. आपणहून कुणीही कुणाच्या मागं लागून काळजी घ्यायला तयार नव्हता.

कुठं तरी जायचं म्हणजे स्वतःच पाहिजे, आसऱ्याला जागा हवी असली तर ती स्वतःच शोधून काढली पाहिजे—झोंप येणें आणि भूक लागणं याच्यांत जो भेद आहे तो त्याला इथ आल्यानतरच प्रथम कळूं लागला.

घर सोडून त्याला कितीतरी दिवस झाले होते रस्तोरस्तीं फिरतांना दिवसेंदिवस देह थकत चालला होता. पैसाही संपत आला होता—अंगावरचे कपडे मळत आले होते तसेच फाटतही आले होते. रात्री डोकं टेकायला जागा सुद्धां मिळायचा पत्ता नव्हता—सुरेंद्राचे डोळे भरून येऊं लागले. घरीं पत्र लिहावं असं कांहीं वाटेना—मोठी शरम वाटूं लागली. सावत्र आईची स्नेहानं कठोर झालेली मुद्रा आठवली म्हणजे घरीं जाण्याची इच्छा कुठल्या कुठं

हवेंन उडून नाहीशी होई. तिथं कुणी तरी आपलीं माणसं आहेत अशी कल्पना करणं सुद्धां त्याला भीतिदायक वाटूं लागल.

एके दिवशी त्यानं आपल्यासारख्या एका दरिद्री माणसाला गांठून विचारलं, "अरे बाबा, तुझं इथ जेवायचं खायचं कशा रीतीन चाललय?"

तो माणूस एक प्रकारें साधा भोळा होता म्हणूनच त्यानें त्याची थट्टा केली नाहीं. तो म्हणाला, "नोकरी करून खाण्यापुरतं थोड बहुत मिळवतों. या कलकत्त्यांत रोजगाराची कसली चिंता ?"

सुरेंद्र म्हणाला, "मला कुठं नोकरी लावून देशील ?"

तो म्हणाला काय येतं तुला ?"

सुरेंद्रनाथाला कसलच काम करतां येत नव्हतं, म्हणून तो उगीच राहून विचार करूं लागला.

"गृहस्थ माणूस आहेस का तू ?"

सुरेंद्रानं मानेन होकार दिला.

"मग शिकला नाहींस का ?"

"शिकलोंय."

थोडा वेळ विचार करून तो माणूस म्हणाला, "तर मग या समोरच्या मोठ्या घरी जा. तिथं बडे लोक—जमीदार राहतात—तिथं कांहींतरी काम मिळेल तुला." अस म्हणून तो निघून गेला.

सुरेंद्रनाथ त्या घराच्या फाटकापाशीं आला, थोडावेळ उभा राहिला, पुनः माग गेला, पुन: फिरून आला—पुनः निघून गेला. त्या दिवशीं कांहीच झालं नाही.

दुसरा दिवसही असाच गेला. दोन दिवसांच्या अनुभवानं उसनं अवसान आणून त्यान घरांत प्रवेश केला. समोरच एक नोकर होता त्यानं त्याला विचारलं, "काय पाहिजे ?"

" बाबूजींना—"

" बाबूजी घरी नाहींत."

सुरेंद्राची मुद्रा आनंदानं भरून उठली. एका भयंकर संकटांतून आपण सुटलों असं त्याला वाटलं. बाबू घरीं नाहींत—नोकरीची बाब, दुःखाची कहाणी विनवून सांगायची—ती सांगावी लागली नाहीं हेंच त्याच्या आनंदाचं कारण.

दुप्पट उत्साहानं तो शेजारच्या दुकानीं गेला आणि पोटभर खाऊन घेऊन मनींच्या आनंदांत कांहीं वेळ इकडे तिकडे फिरत राहिला. त्याच्या मनांत एकच विचार चालला होता, कीं दुसऱ्या दिवशीं कशाप्रकारें आपण बोललों म्हणजे आपलं काम निश्चितपणें होऊं शकेल आणि कांहींतरी ठाव ठिकाणा लागेल !

पण दुसऱ्या दिवशीं तो उत्साह शिल्लक राहिला नाहीं. जसजसा तो त्या घराजवळ येऊं लागला तसतसं परत निघून जावं असं त्याला वाटूं लागलं. कसाबसा फाटकाशीं येऊन पोंचला त्यावेळीं तो अगदीं थकून गेला होता. आंत जायला पायच उचलत नव्हता. स्वतःच्या इच्छेनं आपण इथं आलों आहे असं आज त्याला कांहीं केल्या वाटत नव्हतं—कुणीतरी जबरदस्ती करून आपल्याला इथं लोटून दिलं आहे असाच त्याचा समज झाला होता.

दाराजवळ राहून उमेदवारी करण्यापेक्षां आंतच जावं म्हणून त्यानं घरांत प्रवेश केला. त्याच नोकराची भेट झाली. तो म्हणाला, " बाबूजी घरीं आहेत. भेटायचं आहे का ? "

" हो. "

" या तर मग. "

ही मोठी मुष्कील आली.

जमीदारबाबूचं घर फार मोठं होतं. साहेबीनं पद्धतीनें चोंहींकडून सजवलेलं होतं. खोलीपलीकडे खोली, संगमरवरी जिना, लाल अलवाणाच्या पिशवीनं झांकलेलीं दिव्याचीं झुबरं प्रत्येक खोलींत दिसून येत होतीं. भिंतीपाशीं मोठमोठे आरसे—किती तरी तसबिरा—कितीतरी फोटोग्राफ दिसत होते. दुसऱ्या कुणाला काय वाटलं असेल तें सांगतां यायचं नाहीं पण सुरेंद्राला यांत नवीन अस कांहींच नव्हतं. कारण त्याच्या बापाचं घर म्हणजे कांहीं अगदींच दरिद्र्याची झोंपडी नव्हती. बाकी कांही असो पण तो कांहीं दरिद्री घरांत वाढला नव्हता. हा जो कुणी गृहस्थ आहे त्याच्याशीं आपली भेट व्हायची आहे—अर्ज विनंती करायची आहे—तो काय प्रश्न करील आणि त्याला आपण काय उत्तर द्यायचं याचाच विचार सुरेंद्राच्या मनांत घोळत होता.

पण विचार करायला आतां अवधी नव्हता. घरधनी समोरच बसले होते त्यांनीं सुरेंद्रनाथाला विचारलं, " काय काम आहे ? "

आज तीन दिवस या प्रश्नाचं उत्तर कशा प्रकारे द्यायचं हें सुरेंद्र जें कांहीं मनाशीं ठरवीत होता तें यावेळीं त्याला कांहींच आठवेना. तो म्हणाला, " मी-मी—"

व्रजनाथ लाहिरी पूर्व बंगालचा एक जमींदार होता. त्याच्या डोक्यावरचे चार दोन केस पिकूं लागले होते—अव्यवस्थितपणामुळं नव्हे—योग्य वयोमानाप्रमाणे ते पिकले होते. फार मोठा माणूस—पुष्कळ ठिकाणीं हिंडला फिरलेला—सुरेंद्रनाथाच्या परिस्थितीची बरीचशी अटकळ चट्कन् करून तो म्हणाला, " बरं बाबा, तुला काय पाहिजे ? "

" कांहीं तरी एक—"

" एक काय ? "

"नोकरी—"

थोडस हंसून व्रजराजबाबू म्हणाले, "माझ्याकडे नोकरी मिळेल असं कुणी सांगितलं तुला ?"

"रस्त्यांत एक माणूस भेटला, त्याला मी विचारलं, त्यानंच आपल नांव—"

"ठीक तुझं घर कुठं ?"

"पश्चिम प्रांतीं."

"तिथं कोण आहे तुझं ?"

सुरेंद्रनाथान सारी हकीकत सांगितली.

"तुझा बाप काय करतो ?"

परिस्थितीकडे लक्ष दिल्यामुळें सुरेंद्रनाथाला नवी नजर आली होती. जरा जुळवून जुळवून त्यानं उत्तर दिलं, "नोकरी आहे थोडीशी."

"त्यांत भागत नाहीं म्हणूच का तूं नोकरीसाठीं निघाला आहेस ?"

"हो."

"इथं कुठं राहतोस ?"

"कुठ निश्चित जागा नाहीं—जिथं जमेल तिथं राहतों."

व्रजबाबूंला दया आली. सुरेंद्रनाथाला जवळ बसवून घेऊन ते म्हणाले, "अजून तू अगदीच पोर आहेस. या वयांत तुला घर सोडून निघणं भाग पडल याचं दुःख तुला जाणवलंय. तुला देण्याजोगी नोकरी माझ्यापाशीं नाही, पण कांहीं तरी व्यवस्था करतां येईल की नाहीं याचा प्रयत्न करून पहातों ?"

'ठीक आहे,' असं म्हणून सुरेंद्रनाथ जायला निघाला अस पाहून व्रजबाबू त्याला पुन: बोलावून म्हणाले, "आणखी कांहीं विचारायचं नाहीं का तुला ?"

" नाहीं. "

" एवढ्यानंच तुझं काम झालं? मी काय करणार, कशा प्रकारें प्रयत्न करणार,—असं कांहीं विचारावं असं नाहीं का वाटल तुला?"

सुरेंद्रनाथ ओशाळून मागे फिरला आणि तसाच उभा राहिला. व्रजबाबू हंसून म्हणाले, " आतां कुठ जाणार?"

" कुठल्यातरी दुकानीं. "

" आणि तिथ कांहीं तरी खाणार?"

" रोज तेंच करतोंय. "

" तूं लिहायला कितीसा शिकलाहेस?

" थोडे बहुत शिकलोंय. "

" माझ्या मुलाला शिकवशील?"

सुरेंद्रनाथ खूष होऊन म्हणाला, " शिकवीन. "

व्रजबाबू पुनः हसले. दुःखानं आणि दारिद्र्यानं या माणसाचं डोकं बिघडलं आहे असंच त्यांना वाटलं. कुणाला शिकवायचं, काय शिकवायचं हे कांहींसुद्धां कळलं नसतांना हा माणूस एवढा खूष झाल्याचं पाहून त्याच्या वेडगळपणाचं त्यांना कौतुक वाटलं. ते म्हणाले, " समज, तो मुलगा बी. ए. च्या क्लासांत आहे—तर त्याची शिकवणी करतां येईल तुला?"

गंभीरपणें थोडावेळ विचार करून सुरेंद्रनाथ म्हणाला, " तसा थोडाबहुत शिकवीन— "

याउप्पर व्रजबाबू कांहीं बोलले नाहींत. नोकराला हांक मारून ते म्हणाले, " बंकू, या बाबूंना राहायला जागा करून दे आणि यांच्या जेवणाखाण्याची व्यवस्था करायला सांग—" सुरेंद्रनाथाकडे वळून ते म्हणाले, " संध्याकाळीं पुनः तुला बोलवायला पाठवीन. तूं

सध्यां आमच्याच घरीं रहा—नोकरीचं जुळेपर्यंत इथं खुशाल आनंदानं राहा."

दोनप्रहरीं जेवणाचे वेळीं त्यांनीं आपली मोठी मुलगी माधवी हिला बोलावून म्हटलं, "मुली, एका दुःखी माणसाला आपल्याकडे राहवून घेतलं आहे."

"कोण बाबा?"

"तो एक दुःखी माणूस आहे, ह्यापलीकडे मला कांहीं माहित नाहीं. मला वाटतं थोडंबहुत शिकलेला असावा. तुझ्या दादाला शिकवशील का म्हणून विचारलं तेव्हां होय म्हणाला. बी. ए. च्या क्लासांतल्या मुलाला शिकवायची ज्याच्या अंगी धमक आहे तो निदान तुझ्या धाकट्या बहिणीला तरी शिकवूं शकेल यांत संशय नाहीं. म्हटलं, प्रमिलेचा मास्तर म्हणून इथं राहूं दे त्याला."

माधवीनं विरोध केला नाहीं.

संध्याकाळीं त्याला बोलावून घेऊन व्रजबाबूंनीं त्याची कामगिरी त्याला समजावून दिली. दुसऱ्या दिवसापासून सुरेंद्रनाथ प्रमिलेला शिकवूं लागला.

प्रमिला सात वर्षांची होती. ती पहिलं प्रायमर शिकत होती. माधवीअक्काजवळ पहिल्या प्रायमरमधील बेडकाच्या गोष्टींपर्यंत शिकूं लागली होती. कागदपत्रं, वह्या, पाटी पेन्सिल, चित्रं, पेपरमिंटच्या वड्या वगैरे घेऊन ती शिकायला बसली.

"Do not move" सुरेंद्रनाथानं संथा दिली, "Do not move हलूं नकोस."

प्रमिला पाठ करूं लागली, "Do not move हलूं नकोस."

धडा दिल्यावर सुरेंद्रनाथ पाटीपेन्सिल घेऊन आपल्याच रंगांत

आकडे मोडीत बसला. प्रॉब्लेममागून प्रॉब्लेम सॉल्व्ह करूं लागला. सात वाजले—आठ वाजले—नऊ वाजायची वेळ झाली. प्रमिला केव्हां इकडून तिकडे आणि तिकडून इकडे बैठक बदलीत होती, चित्राची वही उलटून पहात होती, कांहीं वेळ आडवी झाली, कांहीं वेळ बसली—वड्या तोंडांत टाकल्या तरी दाद नाहीं!—बिचाऱ्या बेडकाच्या अंगावर शाईच्या रेघोट्या ओढीत सारखी पाठ करीत होती "—Do not move—हलू नकोस."

"मी आतां जातें मास्तर."

"जा."

सकाळींसुद्धां अशा प्रकारे वेळ गेला. पण दुपारचं काम जरा वेगळ्या प्रकारच होतं. नोकरीसाठीं व्रजबाबूनीं चारदोन माणसांना देण्याकरितां पत्रं दिलीं होतीं. तीं पत्रं खिशांत घालून सुरेंद्रनाथ घराबाहेर पडला.

चौकशी करीत करीत तो त्या माणसाच्या घरापाशीं आला. त्यानं पाहून घेतलं, घर केवढं आहे—त्याला किती खिडक्या आहेत—किती खोल्या बाहेरून दिसतात—दुमजली आहे कीं तीन मजली आहे—घरासमोर एखादा लॅंपपोस्ट आहे कीं नाहीं—सारं कांहीं त्यानं नीट पाहून घेतलं आणि काळोख पडायच्यापूर्वीं तो घरीं परत आला.

कलकत्त्याला आल्यावर त्यानं कांहीं पुस्तकं विकत घेतलीं होतीं—घराकडून निघतांनासुद्धां कांहीं पुस्तकं बरोबर आणलीं होतीं—तीं घेऊन गॅसच्या बत्तीजवळ तो अभ्यास करीत बसे. काय झालं म्हणून व्रजबाबूनीं विचारलं तर केव्हां उगीच राही, तर केव्हां सांगे कीं त्या माणसांची कांहीं भेट झाली नाहीं.

*

# ३

व्रजराजबाबूंची पत्नी स्वर्गवासी झाल्याला आज चार वर्षं झालीं. हे दुःख म्हातारपणीं बिचाऱ्याला फार दुःसह झालं. तें कसंही असो—पण लाडकी मुलगी माधवीदेवी सोळाव्या वर्षी विधवा झाल्याच्या दुःखानं व्रजराजाच्या देहांतलं अर्धं रक्त शोषून घेतलं होतं.

मोठ्या थाटानं, मोठ्या हौसेनं त्यांनीं मुलीचं लग्न साजरं केलं होतं. जवळ भरपूर पैसा असल्यामुळं त्यांनीं खर्चाकडे मुळींच लक्ष दिलं नव्हतं. नवऱ्या मुलाची स्वतःची कांहीं इस्टेट आहे कीं नाहीं याचा तपास केला नव्हता. त्यांनीं नुसतं एवढंच पाहिलं, मुलगा शिकतो आहे, देखणा आहे, सद्गुणी आहे, सुस्वभावी आहे—एवढ्यावरच नजर ठेऊन त्यांनीं मुलीच लग्न लावून दिल होतं.

अकराव्या वर्षी माधवीचं लग्न झाल. तीन वर्षं ती नवऱ्यापाशीं होती. तिथं सर्व प्रकारें कोडकौतुक केलं जात होतं! पण तिचा पति योगेंद्रनाथ फार दिवस जगला नाहीं. माधवीच्या या वैवाहिक जीवनांतील साऱ्या आशा पुसून टाकून व्रजराजाच्या हृदयावर आघात करून तो स्वर्गी निघून गेला.

तो आसन्नमरण झाल्याचं पाहून माधवी ज्यावेळीं धाय मोकलून रडूं लागली त्यावेळीं तो मोठ्या प्रेमळपणें म्हणाला, "माधवी, तुला सोडून मी जातों आहें याचंच मला मोठं दुःख होतंय. मरण कांहीं कुणाला चुकलं नाहीं. पण तुला मात्र आतां उभा जन्म क्लेश काढावे

लागणार हें मनांत येऊन माझं मन कासावीस होतंय. तुझं कांहींच कोडकौतुक माझ्याकरवीं झालं नाहीं—"

योगेंद्राच्या खचलेल्या हृदयावर आसवांच्या धारांचा सारखा वर्षाव होत होता. तीं आसवं पुसून माधवी म्हणाली, " पुनः जेव्हां या पायांची भेट होईल तेव्हां काय तें कोडकौतुक—"

योगेंद्रनाथ म्हणाला, " माधवी, जें जीवन तू माझ्या सुखासाठीं समर्पण करणार होतीस तें जीवन आतां सर्वांच्या सुखासाठीं कामीं लाव. जिथं कुठं कुणाची मुद्रा दुःखी झालेली दिसेल तिथं तें तोंड उजळ करण्याचा प्रयत्न करीत जा. आणखी काय सांगूं माधवी !—" पुनः आसवांच्या धारा वाहूं लागल्या—माधवीनं त्या पुसून घेतल्या.

"सन्मार्ग सोडूं नकोस—तुझ्या पुण्याईनं पुनः आपण उभयतां भेटूं !"

त्या दिवसापासून माधवीच्या वृत्तींत सर्वस्वी बदल झाला. राग, द्वेष, हेवा, जो कांहीं तिच्या अंतःकरणांत होता तो सारा नवऱ्याच्या चिताभस्मा-बरोबर तिनं या जीवनापुरता गंगेच्या प्रवाहांत सोडून दिला.

या जीवनांत तिनं केवढ्या आशा बाळगल्या होत्या ! केवढ्या आकांक्षा अंदाजल्या होत्या ! वैधव्य आलं म्हणून त्या कांहीं नाहींशा होत नव्हत्या—पण माधवीनं नवऱ्याच्या तोंडचे शेवटचे शब्द हृदयांत सांठवून ठेवले होते. आतां तो नाहीं, मग कुणासाठीं या आशा आकांक्षा ? कुणासाठीं आतां दुसऱ्याचा हेवा करायचा ? कुणासाठीं आतां दुसऱ्याच्या डोळ्यांतून टिपं पडायचीं ? तसं पाहिलं तर हीन प्रवृत्ति तिच्या अंतःकरणांत पहिल्यापासूनच नव्हती. थोरामोठ्यांची मुलगी—जें म्हणावं तें घडून येणं कांहीं अशक्य नव्हतं—द्वेष, मत्सर ती कधीं शिकलीच नव्हती.

तिच्या स्वतःच्या बागेंत रोज किती तरी फुलं फुलत होतीं. त्या फुलांच्या माळा गुंफून पूर्वी ती नवऱ्याच्या गळ्यांत घालीत असे. आतां तो नाहीं—म्हणून तिनं झाडावरचं फूल तोडणं सोडून दिलं.

झाडांवर रोज तशींच फुलं आज फुलत होतीं—पण जमिनीवर पडून सुकून जात होतीं.

आतां ती पूर्वीसारखी माळा गुंफीत नव्हती—फुलांचे गुच्छ बांधून ओंजळ भरभरून गरीब दुबळ्यांना देत होती. ज्याच्यापाशीं जे नाहीं तें त्याला द्यायचं, त्यांत एवढासुद्धां आखुडता हात घ्यायचा नाहीं कीं उगीच दातृत्वाच्या गर्वानं फुलून जायचं नाहीं!

व्रजबाबूंची पत्नी स्वर्गवासी झाल्यादिवसापासून त्यांच्या संसारांतला व्यवस्थितपणा नाहीसा झाला होता. जो तो प्रत्येक बाबतीत आपल्या-पुरतं पहात असे. कोण कुणाची काळजी घेत नसे की कोण कुणावर नजरही ठेवीत नसे. सारे नोकर आपापल्यापरीनं स्वतःच्या लहरीप्रमाणें धन्याचीं कामं करीत होते. सैंपाकघरांत भटजी अन्न शिजवीत होता—मोठ्या अन्नछत्रांत जेवायला येणाऱ्या माणसांप्रमाणें जो येईल तो जेवून जात होता. कुणाला भरपूर मिळत होतं तर कुणाला कांहींच मिळत नव्हतं—त्या बाबतींत कोण कुणाची कदर करीत नव्हता.

भरल्या भाद्रपदांतील उफाळत्या गंगेसारखं रूप, स्नेह, मायाममता घेऊन माधवी ज्या दिवशीं पुन: माहेरीं आली, त्या दिवसापासून त्या ओसाड संसारांत पुन: वसंताचा उदय झाला. आतां सारे म्हणत होते, 'आक्का!' सारे म्हणत होते 'माधवी.' दिवस मावळेपर्यंत वाडींतल्या पाळलेल्या कुत्र्यापर्यंत प्रत्येकजण आक्काला भेटायला आतुर झालेला असे. एवढ्या साऱ्या घरच्या माणसांत ती सर्वांना सर्व प्रकारें सांभा-

ळीत होती— सर्वांवर नजर ठेवीत होती. घरच्या मालकापासून तो दिवाण, कारकून, नोकरचाकर, दासदासी, सारे आक्काच्या तोंडांकडे. पहात राहिले होते. सर्वांच्या कल्याणाचा भार तिच्यावर होता. कोणत्याही कारणानं का असेना, सर्वांनीं जसं कांहीं ठरवूनच टाकलं होतं, कीं या आक्कावर प्रत्येकाचा कांहीं ना कांहीं तरी हक्क आहे.

स्वर्गांतला कल्पवृक्ष कांहीं कुणीं कधीं पाहिला नाहीं—कुणाला कधीं दिसेल कीं नाहीं तें कांहीं सांगतां यायचं नाहीं—त्या कल्पवृक्षाच्या गोष्टी हव्यात कशाला? पण व्रजबाबूंच्या या साऱ्या माणसांना एक कल्पवृक्ष लाभला होता. या कल्पवृक्षाकडे जायचं, हात पसरायचा आणि खुष होऊन यायचं.

असल्या या परिवारांत सुरेंद्रनाथाच्या जीवनाला एक नवीनच वळण लागलं. त्याला मार्ग सांपडला. सारेच जेव्हां एकाच व्यक्तीवर सारा भार टाकून राहिले होते, त्याअर्थी तोही त्यांच्यासारखा वागूं लागला होता.

पण इतर लोकांपेक्षां त्याची सुधारणा वेगळ्या प्रकारची होती. त्याला हें कळून चुकलं होतं, कीं आक्का नांवाची एक चालती बोलती व्यक्ति घरांत आहे, ती सर्वांवर सारखी नजर ठेवते, सर्वांची कोडकौतुकं पुरवते, ज्याला जे हवं असेल तें त्याला तिच्याकडून मिळतं स्वतःची काळजी स्वतः घेण्याचं संकट त्यानं कलकत्त्याच्या रस्त्यांतून हिंडतां हिंडतां ब्रंचसं अनुभवलं होतं. पण इथं आल्यापासून ते सारं बदललं होतं. आपल्या गतजीवनांतला एकादा दिवस केव्हां तरी आपल्याला आठवावा लागेल हें सुद्धां तो विसरून गेला होता.

आंगरखा, धोतर, बूट, छत्री, काठी वगैरे आवश्यक वस्तू त्याच्यासाठीं भरपूर तयार होत्या. हात रुमालापर्यंतची प्रत्येक वस्तू त्याच्यासाठीं

मोठ्या काळजीपूर्वक तयार ठेवली जात होती. पहिल्यान त्यानं चौकसपणानें विचारलं, " हें सारं आलं कुठून ? "

त्याला उत्तर मिळालं, " आक्कानं पाठवून दिलंय. "

फराळाच्या थाळीपर्यंत पाहिल्यावर त्याला आजकाल सहज कळून येई, कीं हे सारं आक्काच्या काळजीचं फळ.

एके दिवशीं आंकडे मोडीत बसल्यावेळीं त्याला कंपासाची गरज भासली तो प्रमिलेला म्हणाला, " आक्काकडून कंपास घेऊन ये. "

आक्काच्या कामाकाजाच्या जंत्रींत कंपासचा समावेश झालेला नव्हता. तिच्याजवळ कंपास नव्हता म्हणून बाजारांत माणूस पाठवून तिनं कंपास आणवला. संध्याकाळीं फिरून आल्यानंतर सुरेंद्रनाथाला दिसून आलं कीं त्याच्या टेबलावर मागितलेली वस्तु हजर होती. दुसऱ्या दिवशीं सकाळीं प्रमिलेनं सांगितलं. " मास्तर महाशय, काल आक्कानं हा कंपास पाठवून दिलाय. "

तेव्हांपासून सुरेंद्रनाथ असा कांहीं एकादा जिन्नस मागून बसे, कीं तो मिळवायला माधवीला मोठी मुष्कील पडे. बराच तपास केल्यानंतर त्याची गरज भागवतां येई, पण ' देतां येत नाहीं ' असं कधींही तिनं म्हटलं नाहीं.

एकादे वेळीं एकदम तो प्रमिलेला सांगे, " आक्काकडून पांच जुने कपडे घेऊन ये. भिकाऱ्याला द्यायला हवे. " जुन्यानव्याची पंचाईत करायला माधवीला साऱ्याच वेळीं अवसर मिळत नसे. ती आपल्या सांठ्यांतले पांच कपडे पाठवून देई आणि वरच्या खिडकींतून पाही— चारपांच जण दुःखी दरिद्री लोक मोठ्या खुषींत ओरडत जात आहेत !—त्यांनाच तीं वस्त्रं मिळालेली असत.

सुरेंद्रनाथाचे हे लहानसहान हट्ट माधवीला सदोदीत पुरवावे लागतात. हळूहळू ती गोष्ट तिच्या अंगवळणी पडली. एक नवा जीव आपल्या संसारांत आला आहे आणि आपल्या रोजच्या कामकाजांत कमीजास्त प्रमाणांत उपद्रव द्यायला सुरवात करतो आहे, हें सुद्धां तिच्या मनांत येत नसे.

एवढंच नव्हे, तर या नव्या जीवासाठीं माधवीला आजकाल चांगलीच काळजी घ्यावी लागत असे. पदोपदीं तपास करावा लागत असे. स्वतःसाठीं त्यानं जर हे जिन्नस मागितले असते तर माधवीचे अर्धे अधिक श्रम वाचले असते, पण स्वतःसाठीं तो कांहींच मागत नव्हता, हेंच तिच्या मनाला फार लागत असे.

सुरेंद्रनाथ म्हणजे एक भ्रमिष्ट माणूस आहे हें पहिल्यानं तिला कळलं नाहीं. सकाळीं पाठवलेला चहा थंड होऊन जाई तरीसुद्धां तो पीत नसे. फराळाचं पाठवलं तर त्याला हात लावायची सुद्धां त्याला आठवण होत नसे.—केव्हां केव्हां ते फराळाचे जिन्नस कुत्र्याला खायला घालून तो निघून जाई. जेवायला बसला तर अन्नाची तो कांहींच पर्वा बाळगीत नसे; केव्हां बाजूला सारून ठेवी तर केव्हां ताटाखालीं टाकून देई—जसा कांहीं त्याला त्यांतला कोणताच जिन्नस आवडला नसावा !

नोकरचाकर म्हणत, " मास्तरबाबू वेडा आहे. कांहीं समजत नाहीं कीं उमजत नाहीं--आपलं पुस्तक घेऊन बसलेला असतो. "

नोकरीबद्दल कांहीं जमलं कीं नाहीं, म्हणून मधूनमधून व्रजबाबू चौकशी करीत. त्यांना तो उडवाउडवीची उत्तरं देई. ही हकीकत माधवीला जेव्हां तिच्या बापाकडून कळे तेव्हां तिला वाटे, कीं मास्तर-

बाबू नोकरी मिळवण्यासाठीं एवढासुद्धां प्रयत्न करीत नाहीं—कीं प्रयत्न करायची त्याची इच्छाही नाहीं. जें कांहीं मिळालं होतं त्यावरच तो अगदीं संतुष्ट होता.

दहा वाजले कीं आक्काकडून अंघोळीला जायची ताकीद येई. त्यानंतर जेवण. चांगलंसं जेवला नाहीं तर आक्काच्या वतीनं प्रमिला येऊन त्याला आग्रह करी. रात्रीं फार वेळपर्यंत पुस्तक घेऊन वाचीत बसला तर नोकर येऊन ग्यासची चावी बंद करी. त्यानं नको म्हटलं तर तो सांगे, " आक्काचा हुकूम. "

एके दिवशीं माधवी हंसत हंसत आपल्या बापाला म्हणाली, " बाबा, आपली जशी प्रमिला तसाच हा मास्तर. "

" म्हणजे काय मुली ? "

" दोघंही पोरंच. केव्हां काय हवं तें जसं प्रमिलेला कळत नाहीं—केव्हां जेवायचं, केव्हां झोंपायचं, केव्हां काय करायचं हें कळायच्या बाबतींत तिचा हा मास्तरही तसाच ! स्वतःला काय हवं हेंच त्याला कळत नाहीं— केव्हां केव्हां भलत्याच वेळीं असा कांहीं जिन्नस मागतो कीं कळलं असतं तर त्यानं अशी मागणी कधींच केली नसती. "

माधवीच्या भाषणाचा अर्थ व्रजबाबूला चांगलासा कळला नाहीं. ते नुसते पहात राहिले.

माधवी हंसून म्हणाली, " केव्हां काय हवं हें तुमच्या या मुलीला कळतं का ? "

" नाहीं का कळत ? "

" भलत्या वेळीं भलताच हट्ट करते ना ती ? "

" हो करते. "

" मास्तरबाबूसुद्धां त्यांतलाच—तसंच करतो. "

व्रजबाबू हंसून म्हणाले, " मला वाटतं तो जरासा वेडसर आहे."

" वेडसर नाहीं—मला वाटतं तो थोरामोठ्यांचा मुलगा आहे. "

आश्चर्यचकित होऊन व्रजबाबूंनीं विचारलं, " हें कसं कळलं तुला ? "

माधवीला हें कळलं नव्हतं. तो तिचा अंदाज होता. सुरेंद्राला स्वतःचं काम स्वतः करतां येत नाहीं, प्रत्येक बाबतींत दुसऱ्यावर अवलंबून असतो, दुसऱ्यानं केलं तर होतं नाहींतर कांहींच होत नाहीं—ही त्याची परावलंबी वृत्ति पाहून माधवीनं ही अटकळ केली होती. पूर्वीच्या संवयीमुळच तो असं करतो तिला वाटे.

विशेषत: जेवणाखाण्याच्या बाबतींतली त्याची पद्धती पाहून माधवीला मोठं आश्चर्य वाटे. कुठलाच खाण्याचा जिन्नस तो रुचीनं खात नसे. कोणत्याच जिनसाबद्दल त्याची आवड नसे. पोटभर असं त्यानं कधींच कांहीं खाल्लं नाहीं. कोणत्याच वस्तूच्या ठायीं आवड नाहीं कीं नावड नाहीं. अस हे वृद्धासारखं वैराग्य, बालकासारखी सरलता, वेड्यासारखी उपेक्षा—खायला दिलं तर खायचं, नाहीं दिलं तर उपाशीं रहायचं--या साऱ्या गोष्टी पाहिल्या म्हणजे तिला मोठं कौतुक वाटे. कुठून तरी आलेल्या या मास्तरबाबूकडे म्हणूनच ती आपुलकीच्या नजरेनं पाहूं लागली.

मागायची लाज वाटते म्हणून तो मागत नव्हता असं नव्हे. जरूर वाटली नाहीं—म्हणून मागितलं नाहीं एवढंच. ज्यावेळीं जरूर वाटे त्यावेळीं तो वेळ अवेळ पहात नसे—अगदीं अचानक आकाच्या समोर त्याची मागणी जाऊन पोहोंचे. माधवी गालांतल्या गालांत हंसून म्हणे, " अगदीं पोरांतलं पोर आहे बिचारं ! "

# ४

मनोरमा माधवीची बाळमैत्रिण. बरेच दिवस माधवीकडून पत्र गेलं तरी उत्तर आलं नाहीं म्हणूनच ती अगदीं चिडली होती. आज दुपारीं थोडासा वेळ मिळाला म्हणून ती पत्र ल्याहयला बसत होती. इतक्यांत प्रमिलेनं येऊन हांक मारली, " आक्का ! "

वर पाहून माधवीनं विचारलं, " काय आहे ? "

" मास्तर महाशयांचा चष्मा कुठं हरवलाय--एक चष्मा हवाय्. "

माधवी सारखी हंसत सुटली, ती म्हणाली, " तुझ्या मास्तर महाशयांना म्हणावं--माझं चष्म्याचं दुकान का आहे ? "

प्रमिला पळत जात होती, तिला थांबून माधवी म्हणाली, " कुठं चाललीस ? "

" मास्तरांना सांगायला. "

" त्यापेक्षां कारकूनाला बोलावून आण इकडे ! "

प्रमिला कारकुनाला घेऊन आली तेव्हां माधवी त्याला म्हणाली, " मास्तरबाबूंचा चष्मा हरवलाय. कसली काच हवी आहे त्याची चौकशी करून एक चष्मा आणून द्या. "

कारकून निघून गेल्यावर तिनं मनोरमेला पत्र लिहिलं पत्राच्या शेवटीं लिहिलं—

" प्रमिलेसाठीं बाबांनीं एक मास्तर नेमला आहे. त्याला माणूस म्हणावं कीं मूल म्हणावं हाच प्रश्न पडतो. मला वाटतं, यापूर्वी तो कधीं

घराबाहेर पडलाच नव्हता. त्याला संसारांतलं कांहींसुद्धां कळत नाहीं. त्याच्यावर नजर ठेवली नाहीं, वेळींच व्यवस्था केली नाहीं तर त्याचा एक क्षणसुद्धां जायचा नाहीं. माझा अर्धा वेळ त्याची बरदास्त करण्यांत जातो—मग तुला पत्र केव्हां लिहूं ? लवकरच जर इकडे तुझं येणं झालं तर हा बावळट माणूस तुला दाखवून देईन. असला भाबडा, भ्रमीष्ट माणूस तूं उभ्या जन्मांत पाहिला नसशील. खायला दिलं तर खातो, नाहीं तर मुकाट्यानं उपास करतो. आपल्याला जेवायचं आहे याची उभ्या दिवसांत त्याला आठवण सुद्धां नसते. आपली आपण तरतूद करणं त्याला एक दिवससुद्धां जमायचं नाहीं, म्हणूनच मला वाटतं, असलीं माणसं या जगांत घर सोडून बाहेर निघतात कशाला ? त्याचे आईबाप आहेत असं कळतं. पण मला वाटतं, त्यांचं अंतःकरण दगडाचं असलं पाहिजे. अशा माणसाला मी केव्हांसुद्धां दृष्टीआड होऊं दिलं नसतं—"

मनोरमेनं थट्टेथट्टेनं उत्तर लिहिलं,—" तुझ्या पत्रांतला सारा मजकूर कळला. त्यावरून मला कळून आलं, कीं तू घरांत एक माकड पाळलंयस आणि तूं त्याची सीता होऊन बसलीयस. म्हणूनच तुला जरा सावध राहायचा इषारा देतें. तुझी —मनोरमा ! "

पत्र वाचल्यावर माधवीची मुद्रा थोडीशी बिघडली. तिनं उत्तरीं लिहिलं,—" जळ्ळं तुझं तोंड ! कुणाची कसली थट्टा करावी हें सुद्धां तुला कळत नाहीं. ? "

माधवीनं विचारलं, " प्रमिला, तुझ्या मास्तर महाशयांचा चष्मा कसा काय आहे ? "

प्रमिला म्हणाली, " छान. "

" तुला कसं कळलं ? "

" मास्तरमहाशय चष्मा लावून पुस्तक वाचताहेत—म्हणून कळलं मला. "

माधवी म्हणाली, " त्यांनीं स्वतः कांहीं सांगितलं नाहीं ? "

" मुळींच नाही. "

" एक शब्दसुद्धां नाहीं ? चष्मा लागतो कीं लागत नाही,—कांहींच नाही ? "

" नाहीं—कांहींसुद्धां नाहीं. "

माधवीची सदा प्रसन्न असणारी मुद्रा एक क्षणभर कोमेजल्यासारखी झाली.—पण लगेच हंसून ती म्हणाली, " तुझ्या मास्तरना म्हणाव-आतां पुनः चष्मा हरवूं नका. "

" बरंय, सांगतें. "

" चल, वेडी कुठली, असं कधीं कुणी सांगतं का ? उगीच त्यांना कांहींतरी वाटायचं "

" मग नाहीं सांगत. नको सांगूं ? "

" नको. "

शिवचंद्र माधवीचा वडील भाऊ. एके दिवशीं त्याला गांठून माधवीनं विचारलं, " दादा, प्रमिलेचा मास्तर दिवसरात्र काय वाचीत असतो—माहित आहे तुला ? "

शिवचंद्र बी. ए. च्या वर्गांत होता. यःकश्चित् प्रमिलेच्या मास्तर सारखा क्षुल्लक माणूस त्याच्या खिजगणतींत नव्हता. उडवाउडवीचं उत्तर देत तो म्हणाला, " नाटककादंबरी वाचीत असेल. दुसरं काय वाचणार ? "

माधवीला तें पटलं नाहीं. प्रमिलेकरवीं त्याचं एक पुस्तक आणून

दादाच्या हातीं देऊन ती म्हणाली, " ही नाटककादंबरी असेलसं नाहीं वाटत. "

शिवचद्रानं पुस्तक आलटून पालटून पाहिलं पण त्याला तें कसलं पुस्तक हें सांगतां येईना. त्याला वाटलं ते गणिताचं पुस्तक असावं पण तें कसलं गणित याचा त्याला अंदाज आला नाहीं. आपलं अज्ञान बहिणीसमोर उघडकीस येऊं नये म्हणून तो म्हणाला, " हें अंकगणित आहे. शाळेंतल्या खालच्या वर्गांत लावतात. "

ओशाळत माधवीन प्रश्न केला, " कुठल्या तरी मोठ्या परीक्षेचं पुस्तक नव्हे का ? कॉलेजांतलं नव्हे का ?

उत्तर टाळून शिवचंद्र म्हणाला, " नाहीं मुळींच नाहीं. " पण त्या दिवसापासून शिवचंद्र कळून सवरून सुरेंद्राच्या समोर अभ्यास करायला बसत नाहींसा झाला. कदाचित तो कांहीं तरी प्रश्न करील, मागाहून सारं कांहीं उघडकीस येईल आणि बापाच्या हुकमानं सकाळींच उठून प्रमिलेबरोबर या मास्तरसमोर वही पेन्सिल घेऊन बसावं लागेल, अशी त्याला भिती वाटली.

कांहीं दिवसांनीं एक दिवस माधवी बापाला म्हणाली, " मी एकदा काशीला जाऊन येते बाबा. "

व्रजबाबू घाबरून म्हणाले, " म्हणतेस काय मुली ? तूं काशीला गेलीस तर या संसाराचं काय ? "

माधवी हंसून म्हणाली, " पुनः येणार आहे ना मी ?—कांहीं कायमची निघून जात नाहीं. "

माधवी हंसली पण तिच्या बापाच्या डोळ्यांत पाणीं आलं. माधवीला कळून चुकलं, बोलले ही चूक झाली. झाला प्रकार सांवरून घेण्यासाठीं ती म्हणाली, " चार दिवस जरा हवापालट करून येतें. "

" तशी जा हवी तर, पण पोरी, इकडे सारी अंदाधुंदी माजेल."

" माझ्याशिवाय संसार काय चालतच नाहीं ?"

" चालायचा नाहीं कां ? चालेल ! सुकाणूं मोडलं म्हणजे वाहत्या पाण्यांत होडी जशी चालते तसा चालेल."

पण काशीला जाणं तिला अगदी जरूर होतं. तिची विधवा नणंद आपल्या एकुलत्या एक मुलाला घेऊन तिथं रहात होती, त्यांना एकदां भेटून येणं अवश्य होतं.

काशीला जायच्या दिवशीं प्रत्येकाला प्रत्येकाचं काम नीट बजावून सांगून तिनं घरच्या कारभाराची व्यवस्था लावली. बाप, भाऊ आणि प्रमिला यांची कशी तजवीज पहायला तें म्हाताऱ्या दाईला तिनं सांगितलं, पण मास्तरच्या बाबतींत कुणालाच सांगितलं नाहीं

ती विसरली नव्हती, तिनं मुद्दामच सांगितलं नाहीं. अलीकडे त्याच्यावर एक प्रकारें तिचा राग झाला होता. तिनं त्याच्यासाठीं इतकं केलं पण अजूनपर्यंत एका शब्दानं सुद्धां त्यानं कृतज्ञता व्यक्त केली नाहीं, म्हणूनच एकदां बाहेरगांवीं जायचं आणि या उदासी बावळ्या ध्यानाला जाणवून द्यायचं, कीं माधवी म्हणजे कुणीतरी एक आहे ! जरा कौतुक केलं म्हणून बिघडलं ? आपण नसल्यावर हा माणूस कसा काय वागतो तें पहाण्यांत नुकसान कसलं ? म्हणूनच तिनं सुरेंद्राच्या बाबतींत जातेवेळीं कुणाला कांहीं सांगितलं नाहीं.

सुरेंद्र प्रॉब्लेम् सोडवीत होता. प्रमिला म्हणाली, " काल रात्रीं आक्का काशीला गेली ! " पण तें भाषण त्याच्या कानीं गेलं नाहीं.

तीन दिवसांनंतर जेव्हां त्याला दिसून आलं, कीं दहा वाजतां कुणी जेवायची तसदी लावीत नाहीं—क्वचित् केव्हां एकदोन देखील

वाजून जातात, आंघोळ केल्यावर बदलायचं धोतर तितकसं स्वच्छ केलेलं नसतं, फराळाची थाळी तितकीशी काळजीपूर्वक सजवलेली नसते, रात्रीं गॅसची चावी बंद करण्यासाठीं कुणी येत नाहीं—वाचण्याच्या रंगांत दोन तीन वाजून जातात, सकाळीच कुणीं झोपेंतून जागं करीत नाहीं—उठायला वेळ होतो, सारा दिवस डोळ्यावरची झांपड जा म्हटल्या जात नाहीं, देह अगदीं थकून गेल्यासारखा वाटतो, अशा गोष्टी झाल्या तेव्हां सुरेंद्राला वाटलं, कीं घरच्या व्यवस्थेंत कांही तरी बदल झाला आहे.

हवा गरम झाली कीं माणूस पंखा शोधूं लागतो, सुरेंद्रनाथ वाचीत असतांना वर पाहून म्हणाला, " प्रमिला, आक्का इथं नाहीं —नव्हे का ? "

ती म्हणाली, " आक्का काशीला गेली आहे. "

" असं का ! "

आणखी दोन दिवसांनीं एकदां एकदम प्रमिलेकडे पाहून तो म्हणाला, ' आक्का केव्हां येणार ? "

" एक महिन्यानंतर. "

सुरेंद्रनाथ पुस्तक घेऊन वाचूं लागला.

आणखी पांचसहा दिवस गेले. पेन्सिल पुस्तकावर ठेवून सुरेंद्रनाथ म्हणाला, " प्रमिला महिन्यांतले किती दिवस राहिले अजून ? "

" खुप दिवस. "

सुरेंद्रनाथनं पेन्सिल उचलून घेतली, चष्मा काढून दोन्ही काचा धोतरानं साफ केल्या आणि चष्मा लावून तो पुस्तकाकडे पहात राहिला.

दुसरें दिवशीं तो म्हणाला, " प्रमिला, आक्काला तूं पत्र लिहीत नाहींस वाटतं ?

" लिहिते तर. "

" लवकर यायला लिहिलं नाहींस वाटतं ? "

" नाही. "

सुरेंद्रनाथच्या हृदयांतून एक लहानसा सुस्कारा बाहेर पडला. तो म्हणाला, " असंका ! "

प्रमिला म्हणाली, " आक्का आली तर मोठं छान होईल नाहीं मास्तर ? "

" छान होईल. "

" लवकर यायला लिहू ? "

जरा खुलून सुरेंद्रनाथ म्हणाला, " लिही. "

" आपण सांगिलंत म्हणून लिहूं ? "

" लिही. "

' लिही ' म्हणायला त्याला मुळींच संकोच वाटला नाहीं. कां वाटेल ? व्यवहारांतल्या खाचाखोंचा त्याला मुळींच कळत नव्हत्या. आक्कानं लवकर याव असं सांगणं आपल्याला शोभत नाहीं, ऐकणाराला तें रुचायच नाहीं, हें त्याला कळणंच शक्य नव्हतं. जीं नसल्यामुळे त्याला फार क्लेश होत होते, जिच्या गैर हजेरींत त्याची सारीच गैरसोय होत होती, तिला बोलावणं पाठवायला त्याला मुळींच संकोच वाटला नाहीं.

ज्या माणसाच्या ठायीं चौकसपणा कमी, तो माणूस या जगांत साधारणपणें मानवसमाजाच्या जरासा बाहेरच पडतो. ज्या मेळाव्यांत साधारण माणूस मिसळतो, त्या घोळक्यांत तो मिसळून जाऊं शकत नाहीं. साधारण माणसांचीं मतें त्याच्या मताशीं जुळत नाहींत.

चौकसपणा सुरेंद्राच्या स्वभावांत मुळीं नव्हनाच. जितकी त्याची जरुरी असे तितकंच त्याला कळे. त्याच्याबाहेर बुद्धिपुरःसर एक पाऊल टाकायची त्याची इच्छाही नसे—की त्याला फुरसतही नसे. म्हणूनच आक्काच्या बाबतींत त्याला अजूनपर्यंत कांहींच माहिती नव्हती.

इतके दिवस या कुटुंबांत तो वावरत होता, गेले तीन महिने तो सारा भरिभार आक्कावर टाकून मोठ्या आरामांत दिवस कठीत होत पण ही व्यक्ति कोण म्हणून त्यान कधींही चौकशी केली नाहीं. ती केवढी आहे, तिचं वय काय आहे, दिसायला कशी आहे, तिचे गुणदोष काय आहेत, याची त्याला मुळींच माहिती नव्हती— माहिती करून घेण्याची इच्छाच कधीं त्याला झाली नाहीं, इतकंच नव्हे, तर ही कल्पना सुद्धां त्याच्या मनात कधीं आली नाही. तसं पाहिलं तर इतर कुणा माणसानं याच बाबतींत हौसेनं जास्त चौकशी केली असती.

सारे म्हणत होते 'आक्का'—तोही म्हणत होता आक्का! सर्वांचं कोडकौतुक ती पुरवीत असे—त्याचही कोडकौतुक करीत असे! कुबेराच भांडार त्याच्या हाताशी आल होतं. जे मागावं ते मिळत होतं—सुरेंद्र ते मिळवीत होता यांत आश्चर्य ते कसलं? मेघाचं काम म्हणजे पाऊस पाडण, आक्काच काम म्हणजे कोडकौतुक करणं. पाऊस पडूं लागला की हात पुढ करतांच हातावर पाणी पडतं; आक्काच्या पुढं हात पसरला कीं हवी ती वस्तू हातीं येते. सर्व-साधारणपणें त्यानं असा समज करून घेतला होता, कीं ती सुद्धां मेघासारखीच आंधळी—कामना किंवा आकांक्षाहीन असावी.

आल्यापासून त्यानं जी ही कल्पना बनवून ठेविली होती तीच आजवर कायम होती. काशीचा प्रवास झाल्यापासून त्याला आणखी हे कळून चुकल, कीं आक्काशिवाय एक क्षणभरही आपली धडगत नाही.

तो घरीं होता त्यावेळीं आपल्या बापाला पाहत होता—सावत्र आईला पहात होता—त्याचं कर्तव्य काय हे त्याला कळत होतं. पण आक्रानामक कुणा व्यक्तीशीं त्याचा परिचय झाला नव्हता. ज्यावेळीं परिचय झाला त्यावेळीं त्याला हें सारं कळून आलं.

पण त्या व्यक्तीला त्यानं प्रत्यक्ष पाहिलं नव्हतं—तिची ओळख नव्हती—तो नुसतं नांव ओळखत होता. नांवावरच त्याचा आधार होता. नांव म्हणजेच सर्वस्व—व्यक्ती त्याच्या हिशेबीं नव्हती !

भक्त जसा इष्टदेवतेला प्रत्यक्ष पाहूं शकत नाहीं, नुसतं तिचं नांव घेतो, संकटाच्या वेळीं त्या नांवा समोरच अंतःकरण उघडं करतो, गुढघे टेकून करुणा भाकतो—डोळ्यांत पाणी आलं तर तें पुसून टाकून शून्य दृष्टीनं कुणीतरी दिसावं अशी अपेक्षा करतो—पण कुठंच कांहीं दिसत नाहीं—अस्पष्ट वाणीनं चारदोन अस्फुट शब्द बोलून उगीच राहातो, तसंच हे.

क्लेश होऊं लागले तेव्हां सुरेंद्रनाथही अस्फुट वाणींत उद्गारला, “ आक्का ! ”

---

# ५

त्यावेळीं सूर्योदय झाला नव्हता. नुकतीच पूर्वदिशा उजळत होती. प्रमिला धांवत आली आणि झोंपलेल्या सुरेंद्रनाथाला कवटाळून म्हणाली, " मास्तर, अहो मास्तर. "

सुरेंद्रनाथाचे आळसावलेले डोळे थोडेसे उघडले, " काय प्रमिला ? "

" आक्का आली. "

सुरेंद्रनाथ उठून बसला. प्रमिलेचा हात धरून तो म्हणाला, " चल भेटून येऊं. "

ही भेटायची वृत्ति त्याच्या मनांत कशी उद्भवली हें सांगतां येणार नाहीं. एवढ्या दिवसांनीं प्रमिलेचा हात धरून तो डोळे चोळीत चोळीत अंतर्गृहांत कां जायला निघाला तेंही सांगतां यायचं नाहीं. एवढं खरं, की तो घरांत आला. जिना चढून वर गेला. माधवीच्या खोलीसमोर उभा राहून म्हणाला, " आक्का ! "

आक्का आपल्याच कामांत गर्क होती. ती म्हणाली, " आक्का काय ? "

" मास्तर आलेयत. "

प्रमिला आणि सुरेंद्रनाथ तितक्यांत त्या खोलींत येऊन पोंहचलीं होती. घाबरून माधवी उठून उभी राहिली. डोक्यावरचा पदर एक हात पुढ ओढून एका बाजूला जाऊन उभी राहिली.

सुरेंद्रनाथ बोलत होता, " आक्का, तू गेलीस तेव्हांपासून माझे फार हाल झाले—" माधवीला बुरख्याआडून सुद्धां शरम वाटत होती.

जीभ चावून ती मनांतल्या मनांत म्हणाली, ‘ छे छे ! ’

“ तूं गेलीस तेव्हांपासून—”

माधवी मनांतल्या मनांत म्हणाली. ‘ आतां काय म्हणावं याला ! ’

माधवी हळूच म्हणाली, “ प्रमिला, मास्तरना बाहेर जायला सांग. ”

प्रमिला वयानं लहान होती, तरी पण तिला कळून चुकलं कीं इथं कांहीं तरी चूक झालीच. ती म्हणाली, “ चला मास्तर—”

कांहीं वेळ तो घाबरल्यागत होऊन तसाच उभा राहिला. नंतर म्हणाला, “ चल. ”

जास्त शब्द खर्ची घालायची त्याला संवय नव्हती. जास्त शब्द बोलणं त्याला आवडत नसेः तरीपण, सारा दिवस आभाळ आल्यानंतर सूर्य दिसला, कीं माणसाची नजर जशी चट्कन् सूर्याकडे खेचली जाते,—क्षणभरसुद्धां त्याच्या मनांत येत नाहीं, कीं सूर्याकडे पहाणं बरं नाहीं, पाहिलं तर डोळे झिमझिमतात,—त्याचप्रमाणें एक महिना-पर्यंत ढगाआड झालेला सूर्य दिसायला लागल्याबरोबर सुरेंद्रनाथ मोठ्या उल्हासानं सूर्य पाहायला निघाला होता. शेवटीं हें असं होईल याची त्याला कल्पना नव्हती.

त्या दिवसापासून त्याची थोडीबहुत आबाळ होऊं लागली. कां कोण जाणे, माधवीला या गोष्टीची लाज वाटूं लागली होती. बिंदूमाव-शीनं, वाटतं, याच बाबतींत तिची थोडीशी थट्टा केली होती.

सुरेंद्रनाथदेखील थोडासा ओशाळा झाला होता. आजकाल त्याला जाणवूं लागलं होतं, कीं त्याच्या आकाच्या अमर्याद भांडाराला मर्यादा पडूं लागली आहे. बहिणीचं कोडकौतुक, आईचं वात्सल्य आतां त्याला तितकंसं जाणवत नव्हतं. जसं कांहीं तें दूरदूर सरकत जात होतं.

एके दिवशीं तो प्रमिलेला म्हणाला "आक्का माझ्यावर रागावली आहे—नाहीं ?"

प्रमिला म्हणाली "हो."

"कां ग ?"

"आपण असे नकळत खोलींत गेलां कां म्हणून ?"

"जायचं नाहीं—नाहीं ?"

"छे छे, असं जातां येतं का ? आक्का खूप रागावली आहे."

पुस्तक बंद करून सुरेंद्र म्हणाला, "असं का !—"

त्यानंतर एके दिवशीं दुपारीं आभाळ आलं आणि पाऊस पडूं लागला. आज दोन दिवस व्रजराज बाबू घरीं नव्हते. जमीदारीच्या पाहणीसाठीं गेले होते. माधवीच्या हातीं कांहीं काम नव्हतं. प्रमिला फार दंगा करीत होती, तिला पकडून धरून माधवी म्हणाली, "प्रमिला, तुझं पुस्तक घेऊन ये. पाहूं किती शिकली आहेस तें."

प्रमिला एकदम सर्द झाली. माधवी म्हणाली, "पुस्तक घेऊन ये."

"रात्रीं आणीन आक्का—"

"नाहीं—आत्तां आण."

मोठ्या जड पावलांनीं पुस्तक आणण्यासाठीं ती निघून गेली. पुस्तक आणून देऊन म्हणाली, "मास्तरांनीं कांहीच शिकवलं नाहीं. मीच आपली वाचीत असतें."

माधवीनं परीक्षा घ्यायला सुरवात केली. इकडे तिकडे चांचणी घेतल्यावर तिला कळून चुकलं कीं मास्तरनीं कांहींच शिकवलं नव्हतं. एवढच नव्हे, तर हे मास्तर नेमले गेल्यापूर्वीं ती जें कांहीं शिकली होती तें सुद्धां या तीन चार महिन्यांच्या अवधींत हळू हळू पार विसरून गेली होती.

रागाच्या भरांत माधवीनं बिंदूला हाक मारून सांगितलं. "बिंदू, मास्तरना जाऊन विचार—प्रमिलेला इतके दिवसांत कांहीं सुद्धां कां शिकवलं नाहींत ?"

बिंदू ज्यावेळी विचारायला गेली त्यावेळीं मास्तर प्रॉब्लेमवर विचार करीत होते. बिंदू म्हणाली, " मास्तरमहाशय, आक्कानं विचारलंय की आपण प्रमिलाताईला मुळीं कांहीच शिकवलं नाहीं का ?"

मास्तरमहाशयांना कांहीच ऐकूं गेलं नाहीं म्हणून बिंदूनं जरा जोरानं हांक मारली, " मास्तरमहाशय !"

" काय ?"

" आक्कान विचारलंय—"

" काय विचारलंय ?"

" प्रमिलाताईला कां शिकवलं नाही ?"

भ्रमिष्टपणानं त्यानं उत्तर दिलं, " तें जमत नाहीं आपल्याला."

बिंदूला वाटलं, उत्तर कांहीं अगदींच चुकीचं नाहीं. तिनं जाऊन माधवीला सांगीतलं. माधवी सतापली. खालीं येऊन दाराच्या आड उभी राहून बिंदूला पुढं करून म्हणाली, "ताईला मुळीच कां शिकवलं नाही ?"

दोन तीन वेळ पुनः पुनः विचारल्यावर सुरेंद्रनाथ म्हणाला, " मला जमत नाहीं."

माधवीला वाटल, ' हे काय बोलणं झालं ?'

बिंदू म्हणाली, " मग इथं तुम्हाला कशासाठीं ठेवून घेतलंय ?"

" नाहीं ठेवून घेतलं तर जाऊं कुठं ?"

" मग शिकवीत कां नाहीं ?"

सुरेंद्रनाथ आतां कुठं भानावर आला आणि तिच्याकडे वळून पाहून म्हणाला, "काय म्हणतेयस ?"

आतांपर्यंत बिंदूनं जें जें कांहीं विचारलं होतं त्याची जेव्हां तिनं उजळणी केली तेव्हां सुरेंद्रनाथ म्हणाला, "ती तर रोज वाचीत असते !"

"वाचते खरी—पण आपण काय करीत असतां ?"

"नाहीं. मला नाहीं वेळ मिळत."

"मग इथं राहिलां आहांत कशाला ?"

सुरेंद्रनाथ मुकाट्यानं याच गोष्टीचा विचार करूं लागला.

"मग आपण हिला शिकविणार नाहीं तर ?"

"नाहीं—मला शिकवायचं जमत नाहीं."

दाराआडून माधवी म्हणाली, "त्यांना असं विचार बिंदू, मग उगीच खोटं बोलून इतके दिवस इथ राहिलांत कशाला ?"

बिंदूनं तसं देखिल विचारलं. तें ऐकून सुरेंद्राच्या डोक्यांतला प्रॉब्लेम एकदम तुटून फुटून नाहींसा झाला. त्याला थोडसं वाईट वाटलं. थोडासा विचार करून तो म्हणाला, "खरंच तें—ते माझ चुकलंच !"

"सारखे चार महिने असली कसली ही चूक ?"

"खरंच—असं झालं खरं. माझ्या ध्यानांतच आलं नाहीं मुळीं."

दुसरे दिवशीं प्रमिला शिकायला आली नाहीं तें सुरेंद्रनाथाच्या कांहीं ध्यानीं आलं नाहीं.

त्याच्या दुसरे दिवशींही प्रमिला आली नाहीं. तोही दिवस तसाच गेला. तिसऱ्या दिवशीं प्रमिला आली नाहीं असं पाहून सुरेंद्रनाथ एका नोकराला बोलावून म्हणाला, "प्रमिलेला बोलावून आण."

नोकर आंत गेला आणि विचारून येऊन म्हणाला, " ताईसाहेब आतां तुमच्याकडे शिकायला येणार नाहींत. "

" मग कुणाकडे शिकणार ती ? "

स्वतःची बुद्धी खर्चून नोकर म्हणाला, " दुसरा मास्तर ठेवतील. "

त्यावेळीं नऊ वाजले होते. थोडा वेळ विचार करून सुरेंद्रनाथ उठला, दोनतीन पुस्तकें बगलेला मारून उभा राहिला, चष्मा केसींत घालून त्यानं टेबलावर ठेवून दिला आणि हळु हळू तो बाहेर निघून गेला.

नोकर म्हणाला, " मास्तरबाबू, यावेळीं कुठ निघालांत ? "

" आक्काला सांग, मी निघून गेलों. "

" आतां येणार नाहीं पुनः ? "

सुरेंद्रनाथच्या कानीं हा प्रश्न गेला नाहीं. कांहींच उत्तर दिल्याशिवाय तो फाटकाच्या बाहेर पडला.

दोन वाजून गेले, तरीही जेव्हां सुरेंद्र आला नाहीं तेव्हां नोकरानं येऊन माधवीला खबर दिली, " मास्तरमहाशय कुठं निघून गेले. "

"कुठं गेले ? "

" तें माहित नाहीं. नऊ वाजायच्या सुमाराला गेले. जायच्यावेळीं मला सांगितलं, कीं आक्काला सांग कीं मी निघून जातोंय. "

" म्हणजे रे काय ? न जेवतां निघून गेले ? "

माधवी फार उद्विग्न झाली. सुरेंद्रनाथाच्या खोलींत येऊन तिनं पाहिलं—सारं सामानसुमान जिथल्या तिथं होतं, चष्मा केसींत घालून टेबलावर ठेवला होता—फक्त कांहीं पुस्तकं नव्हतीं.

संध्याकाळ झाली—रात्र पडली—सुरेंद्र आला नाही.

दुसरे दिवशीं माधवीनं नोकरांना बोलावून फर्मावलं, " तुम्हीं

मास्तरांचा तपास लावलात तर दहा रुपये बक्षिस देईन." बक्षिसाच्या आशेन ते पळत सुटले.

संध्याकाळीं ते परत आले आणि त्यांनीं सांगितलं, "कुठंच पत्ता लागत नाहीं."

प्रमिला रडत रडत म्हणाली, "ते कुठं निघून गेले आक्का?"

तिला बाजूला लोटून माधवी म्हणाली, "बाहेर जा—रडूं नकोस."

दोन दिवस गेले, तीन दिवस झाले—दिवसांवर दिवस जाऊं लागले तसतशी माधवी अधिकाधिक उद्विग्न होऊं लागली.

बिंदू म्हणाली, "ही एवढी शोधाशोध कां आक्का? या कलकत्त्यांत काय दुसरा मास्तर मिळणार नाहीं?"

माधवी संतापून म्हणाली, "चल–पुरे झालं. हातीं एकसुद्धां पैसा नसतांना माणूस घरांतून निघून जातो आणि तूं विचारतेस शोधाशोधी कां म्हणून?"

"त्याच्या हातीं पैसा नाहीं हें तुम्हाला कसं कळलं?"

"मला माहीत आहे—पण तुला कशाला हवी आहे ती उठाठेव?"

बिचारी बिंदू गप्प बसली. एका मागून एक सात दिवस गेले आणि तो जेव्हां परत आला नाहीं तेव्हां माधवीनं एक प्रकारें अन्न पाणी टाकलं. पुनः पुनः तिच्या मनांत येई, कीं सुरेंद्रनाथ उपासपोटी असेल! हवा तो जिन्नस भरल्या घरांत जो मागून घेत नसे तो दुसऱ्यापुढं हात कसा पसरील? पैसे टाकून खाण्याचे जिन्नस विकत घ्यायला बिचाऱ्यापाशीं पैसा नाहीं, भिक्षा मागायचं सामर्थ्य नाहीं, छोट्या अर्भकासारखा कुठंतरी दीनवाणा फूटपाथवर

बसून रडत असेल, नाहींतर कुठल्यातरी झाडाखालीं उशाला पुस्तकं घेऊन निजून राहिला असेल, असंच तिला वाटूं लागल.

व्रजबाबू परत आले तेव्हां सारी हकीकत त्यांच्या कानीं गेली. ते म्हणाले, "एकंदरींत हें कांहीं बरं नाहीं पोरी!" ते शब्द माधवीच्या मनाला इतके लागले कीं तिला डोळ्यांतलीं आसवं आवरतां आवरेनाशीं झालीं!

इकडे सुरेंद्रनाथ रस्तोरस्तीं हिंडत होता. तीन दिवस उपासपोटी काढले. नळाच्या पाण्याला कांहीं पैसा पडत नाहीं, तेव्हां भूक लागली कीं तो पोटभर पाणी पिऊन घेई.

कुठंतरी त्यान ऐकलं, कीं कालीघाटावर जेवायला मिळतं. म्हणून एके दिवशीं रात्रीं दुबळ्या देहान तो तिकडे जात होता. अंधारी रात्र, त्यांतून वर आभाळ आलेलं, चौरंगीच्या वळणावर एक गाडी येऊन त्याच्यावर आदळली. गाडीवानानं कसाबसा घोडा आवरून गाडीचा वेग कमी करायचा प्रयत्न केला. सुरेंद्रनाथ जिवानिशी मेला नाहीं खरा, पण छातीला आणि पाठीला जबरदस्त धक्का बसल्यामुळं तो मूर्च्छित होऊन पडला. पोलीस आले आणि त्यांनीं गाडींत घालून त्याला इस्पितळांत नेलं.

चार पांच दिवस तो शुद्धीवर नव्हता. त्यानंतर एके रात्रीं डोळे उघडून पहात तो म्हणाला, "आक्का!"

रात्रीच्या ड्यूटिवर असलेल्या कॉलेजांतल्या विद्यार्थ्याच्या कानीं ते शब्द गेले आणि तो जवळ आला. सुरेंद्रानं विचारलं, "आक्का आली आहे?"

"उद्यां सकाळीं येईल."

दुसरे दिवशीं सुरेंद्र चांगला शुद्धीवर आला. पण त्यावेळीं आक्काचं नांव त्यानं काढल नाहीं. ताप भयंकर वाढल्यामुळं सारा दिवस तो तडफडत होता. संध्याकाळीं त्यान कुणाला तरी विचारल, " इस्पितळांत आहे का मी ? "

" हो ! "

" का ? "

" आपण गाडीखालीं सांपडलां होतां. "

" वांचायची आशा आहे ? "

" अगदीं खास. "

दुसऱ्या दिवशीं तोच विद्यार्थी त्याच्याजवळ आला आणि विचारूं लागला, " आपले कुणी नातलग इथं आहेत का ? "

" कुणी नाहींत. "

" तर मग त्या रात्रीं ' आक्का ' म्हणून कुणाला हाक मारीत होतां ? ती कुणी आहे का इथं ? "

" आहे—पण तिला येतां यायचं नाहीं. माझ्या वडिलांना खबर द्याल का ? "

" हो. "

सुरेंद्रनाथानं आपल्या बापाचा पत्ता त्याला सांगितला. त्या विद्यार्थ्यानं त्याच दिवशीं त्या पत्त्यावर पत्र लिहिलं. आक्काचा तपास करण्यासाठीं त्यानं पुनः त्याला विचारलं, " बायाकांना इथं यायला हरकत नाहीं. मी तशी व्यवस्था करूं शकेन. आपल्या वडील बहिणीचा पत्ता दिलात तर तिलाही खबर देतां येईल. "

कांहीं वेळ विचार करून सुरेंद्रनाथानं व्रजबाबूंचा पत्ता सांगितला.

"मी व्रजबाबूंच्या घराजवळच राहातों. आज त्यांना भेटून आपली हकीकत कळवतों, मर्जी असली तर ते येऊन भेटूं शकतील."

सुरेंद्र कांहींच बोलला नाहीं. आक्का येणं अशक्य होतं याचा त्याला अंदाज होता. विद्यार्थ्याला दया आली आणि त्यानं जाऊन व्रजबाबूंना खबर दिली व्रजबाबू घाबरून म्हणाले, "जगायची आशा आहे ना?"

"अगदी खास आहे."

घरांत जाऊन त्यानीं मुलीला सांगितलं, "माधवी, मला वाटत होतं तसंच झालं. गाडीखालीं सांपडून सुरेंद्र आतां इस्पितळांत आहे."

माधवीच्या सर्वांगावर कांटा उभा राहिला.

व्रजबाबू सांगत होते, "तुझं नांव घेऊन—'आक्का' म्हणून हांक मारीत होता. तूं येतेस त्याला पहायला?" त्याच वेळीं मागल्या खोलींत प्रमिलेनं कांहीं तरी भांडीं टाकल्याचा आवाज ऐकू आला. माधवी धांवतच तिकडे गेली.

बऱ्याच वेळाने परत येऊन ती म्हणाली, "मी नाहीं येत—तुम्हीच पाहून या."

व्रजबाबूंना दुःख झालं—तरीही थोडंसं हंसून ते म्हणाले, "अगदीं गोगलगाय आहे तो—त्याचा कसला राग धरायचा?"

माधवी बोलली नाहीं. व्रजबाबू सुरेंद्राला भेटायला एकटेच गेले. त्याला पाहून त्यांना फार दुःख झालं. ते म्हणाले, "सुरेंद्र, तुझ्या आईबापांना खबर दिली तर चालेल का?

"त्यांना कळवलंय."

"कांहीं भिऊं नकोस. ते आले कीं मी सारं ठाकठीक करून देतों." पैशाची अडचण असेल अशी शंका येऊन व्रजबाबू म्हणाले,

" मला त्यांचा पत्ता लिहून दे. इथ यायला त्यांना अडचण पडणार नाही अशी व्यवस्था मी करतों. "

त्यांच्या भाषणाचा उद्देश सुरेंद्रनाथाच्या ध्यानीं आला नाहीं. तो म्हणाला, " बाबा खास येतील—त्यांत अडचण कसली ? "

घरीं परत आल्यावर व्रजबाबूंनीं माधवीला सारी हकीगत सांगितली.

त्या दिवसापासून रोज ते एक वेळ जाऊन सुरेंद्राला भेटून येत असत. त्याना एक प्रकारें त्याचा ओढा लागत होता. एके दिवशीं ते त्याला भेटून आल्यावर म्हणाले, " माधवी, तुझा अंदाज बरोबर होता. सुरेंद्राचा बाप चांगलाच मातबर माणूस आहे. "

माधवीनं आतुरतेनं प्रश्न केला, " तुम्हाला कसं कळल ? "

त्याचा बाप एक बडा वकील आहे. काल रात्रीं तो आला. "

माधवी कांहींच बोलली नाहीं. तिचा बाप म्हणाला, " सुरेंद्र घरांतून पळून आला होता. "

" कां ? "

व्रजबाबूंनीं सांगितलं, " त्याचा बाप मला आज भेटला. त्याचं माझं बोलणं झालं. त्यानं सारी हकीकत मला सांगितली. या वर्षीं पश्चिम युनिव्हर्सिटींत सुरेंद्र एम्. ए. झाला होता. त्यांत त्याला डिस्टिंक्शन मिळालं होतं म्हणून विलायतेला जावं असं त्याला वाटलं. हा असा अगदींच बावळा माणूस म्हणून त्याच्या बापानं त्याला विलायतेला पाठवायचं नाकारल—तेव्हां राग येऊन तो पळून इकडे आला. आतां बरा झाला कीं त्याचा बाप त्याला घरीं घेऊन जाणार आहे. "

डोळ्यांत येणारीं आसवं आवरण्यासाठीं तिनं श्वास रोधून धरला. ती म्हणाली, " तेंच ठीक. "

---

# ६

सुरेंद्र निघून गेला त्याला सहा महिने झाले. या मुदतींत माधवीनं मनोरमेला फक्त एकच वेळ पत्र लिहिलं होतं—नतर लिहिलं नाहीं.

दुर्गापूजेच्या वेळीं मनोरमा जेव्हां माहेरीं आली तेव्हां माधवीला गांठून म्हणाली, " दाखव पाहूं तुझं माकड. "

माधवी हसून म्हणाली, माकड कुठून आणूं ग ? "

माधवीच्या हनवटीला हात लावून मनोरमा सूर धरून गाऊं लागली'—

**तुझ्या चरणिंच्या धुळींत होतें एकाकी बसलेलें ।**
**सखे ! तुझें तें बहु आवडतें माकड बघण्या आलें ॥**

"—तूं पाळलं होतंस ना एक माकड ?"

" केव्हां ? "

गालांतल्या गालांत हंसत मनोरमा म्हणाली, "आठवत नाहीं ? तुझ्याखेरीज दुसऱ्या कुणालाच ओळखत नसे तें ? "

तिच्या भाषणाचा रोख केव्हांच माधवीच्या ध्यानीं आला होता म्हणून तिचा चेहरा हळुहळू पडत जात होता—तरीही मन कसंबसं सावरून घेऊन ती म्हणाली " अ: ! त्याच्याबद्दल बोलतेयस होय ? तो गेला निघून आपला आपण. "

" हे चरणकमल त्याला पसंत पडले नाहींत वाटतं ? "

माधवीनं तोंड फिरविलं—तोंडांतून शब्द काढला नाहीं. आपल्या

दोन्ही हातांनीं तिचे गाल कुरवाळीत मनोरमेनं तिचा चेहरा आपल्या समोर फिरवून घेतला—कौतुक करावं असं तिला वाटलं होतं, पण तिला दिसून आलं, कीं तिच्या दोन्ही डोळ्यांतून आंसवं गळत होतीं. आश्चर्यचकित होऊन ती म्हणाली, " हे काय माधवी ! "

मनाचा आवेग माधवीला अनावर झाला—डोळ्याला पदर लावून ती एकदम रडू लागली. मनोरमेच्या आश्चर्याला सीमा राहिली नाहीं. काय बोलावं हेच तिला सूचेना. तिन कांहीं वेळपर्यंत तिला रडू दिलं. त्यानतर बळेच तोंडावरचा पदर ओढून घेऊन ती अगदी काकुळतीन म्हणाली, " एवढी साधी थट्टा सुद्धां कशी सहन होत नाही तुला ताई ? "

डोळे पुशीत पुशीत माधवी म्हणाली, " मी विधवा आहे मनू ! "

दोघीही कांहीं वेळपर्यंत उगीच राहिल्या होत्या—दोघीही आंतल्या आंत आंसव गाळींत होत्या. मनोरमा रडत होती माधवीच्या दुःखासाठी—ती विधवा होती म्हणून. मण माधवीच्या रडण्याचं कारण अगदी वेगळं होतं. अगदी नकळत मनोरमेनं थट्टेनं म्हटल होतं, ' तुझ्याखेरीज दुसऱ्या कोणाला तो ओळखीत नसे '—माधवी त्याच उद्गारांबरोबर विचार करीत होती. तें तिचं म्हणण पुरेपूर खरं होत हे ती जाणत होती.

बऱ्याच वेळानतर मनोरमा म्हणाली, " एकदरीत हे कांही बर झालं नाही !

" काय बरं झालं नाहीं ? "

" तें काय सांगायला हवं ? मला सार कांहीं कळूनच चुकलंय ! "

गेले सहा महिने ही एकच गोष्ट माधवीनं जिवाभावानं झांकून

ठेवली होती. मनोरमेसमोर ती तशीच झांकून ठेवणं तिला कठीण गेलं. अशा रीतीनं अचूक पकडली गेल्यामुळं ती रडूं लागली— एकाद्या पोरासारखी रडूं लागली.

शेवटीं मनोरमा म्हणाली, " पण तो कां गेला ? "

" मी त्याला जायला सांगीतलं. "

" छान केलंस ! मोठीच अक्कलहुषारी गाजवलीस ! "

मनोरमेला कांहींच कळलं नाहीं असं माधवीला वाटलं, तिनं हळुहळू सारा इतिहास तिला समजावून दिला.

ती कर्मकहाणी सांगून झाल्यावर ती म्हणाली, " पण तो जर जगला नसता तर, मला वाटत मी वेडी झालें असतें. "

मनोरमा मनांतल्या मनांत म्हणाली, ' वेड लागायला आज काय कमी आहे ? '

त्या दिवशीं मोठ्या दुःखित अंतःकरणानं मनोरमा घरीं निघून गेली. कागद लेखणी घेऊन ती त्याच रात्रीं आपल्या नवऱ्याला पत्र लिहायला बसली—

" तुम्हीं म्हणतां तें कांहीं खोटं नव्हे—बायकांच्या जातीवर विश्वास ठेवू नये. मी स्वतांसुद्धां आज तसंच म्हणतें आहें—माधवीनं आज माझे डोळे उघडून दिले. लहानपणापासून तिला मी ओळखत आलें आहें म्हणून तिला दोष देत नाहीं. दोष देतें तो साऱ्या स्त्रीजातीला— ब्रम्हदेवाला दोष देतें. एवढा कोमल, पाण्यासारखा तरळता पदार्थ घेऊन त्यानं स्त्रीजातीचं हृदय कां घडवलं ? प्रेमाचा एवढा मोठा ठेवा सांठवून हें हृदय घडवण्यांत त्यानं काय साधलं ? हें असलं हृदय जरा आणखी थोडं कठिण कर, एवढीच माझी त्या विधात्याच्या चरणीं प्रार्थना आहे.

आणि तुमच्या चरणीं प्रार्थना हीच कीं तुमच्या पायांवर डोकं ठेवून या तोंडाकडे पहात मेलें, कीं मिळविली ! माधवीला पाहून मला मोठी मीति वाटूं लागली आहे. जन्मापासून खिळलेल्या माझ्या साऱ्या समजुती तिनं उलटपालट करून टाकल्या आहेत. आतां माझासुद्धां विश्वास धरूं नका—लवकर येऊन मला घेऊन जा."

तिच्या नवऱ्यानं उत्तरीं लीहिलं—

'जिथं सौंदर्य आहे तिथं त्याचं प्रदर्शन होणारच. ज्याच्या ठायीं गुण आहेत तो ते बाहेर दाखवून देणारच. ज्याच्या हृदयांत प्रेम आहे —प्रेम करणं ही ज्याची वृत्ति आहे—तो प्रेम करणारच ! माधवी-लता रसाळ वृक्षाला ओळंघून राहणारच—ही जगाची रीत आहे—तिथ तुझं माझ काय चालणार ? तुझ्यावर माझा पूर्ण विश्वास आहे. त्याची काळजी तूला नको."

नवऱ्याचं पत्र माथीं धरून मनोरमेनं मनांतल्या मनांत त्याला नमस्कार करून म्हटलं, "जळळी मेली माधवी ! विधवेनं करूं नये तें करून बसली आहे,—मनांतल्या मनांत कुणा एकावर प्रेम केलं आहे तिनं."

मनोरमेचं पत्र वाचून तिचा नवरा गालांतल्या गालांत हंसला. थोडी गंमत करावी म्हणून त्यानं लिहिलं—

'माधवीचं तोंड जळलं यांत कांहीं शंका नाहीं. विधवा असूनसुद्धां तिनं सधवेच्या अधिकारांत असा हात कां घालावा ? मी हयात आहें तोंपर्यंत तुला कांहीं काळजी करायला नको—ही संधी तोंवर तरी तुला मिळणार नाहीं. सध्यां वेळ आहे तोंपर्यंत स्वतःच्या मर्जीखुषीनं दुसऱ्या कुणावर तरी एकदां प्रेम करून पहा. एकंदरींत

मला चकीत करायचा तुझा घाट कांहीं जमून आलं नाहीं. एकदां मी एक वेल पाहिली होती—ती अर्धा कोसपर्यंत जमिनीवर फरफटत जाऊन शेवटी एका वृक्षाला कवटाळून वर गेली होती. आतां केवढी पालवी फुटली आहे तिला! केवढी फुलं बहरून आलीं आहेत! आतां तूं इथं आलीस म्हणजे आपण दोघंजणं जाऊन ती वेल एकदां पाहून घेऊं.—"

मनोरमेला राग आला. तिनं पत्राचं उत्तर पाठवलं नाहीं.

माधवीच्या डोळ्यासभोंवार काजळी पसरली होती. तिची प्रफुल्ल मुद्रा गंभीर झाली होती. घरकामांत सुसंगतपणा रहात नव्हता-—बरीचशी ढिलाई वाढूं लागली होती. सर्वत्रांना वात्सल्यान वागवायची इच्छा तेवढीच जागी होती खरी—उलट वाढलीच होती—पण सर्वांची आठवण पूर्वीसारखी तेवढीशी रहात नव्हती--मधून मधून विसर पडे.

पूर्वीप्रमाणेंच आतांही सारे 'आक्का, आक्का,' म्हणत होते--आजही सारे त्या कल्पतरूपुढं हात पसरीत होते—त्यांच्या मागण्या पुऱ्या होत होत्या.—परतु तें झाड मात्र पूर्वींच्या सारखं रसाळ राहिल नव्हतं—सतेज राहिल नव्हतं. जुन्या माणसांना मधून मधून शका येई, हा कल्पतरू सुकून तर जाणार नाहीं!

मनोरमा रोज येत होती, इकडल्या तिकडल्या गोष्टी बोलत होती. फक्त एवढी एक च गोष्ट ती टाळीत होती. माधवीच्या मनाला दु:ख होईल याची जाणीव मनोरमेला होती. या साऱ्या गोष्टींची चर्चा जेवढी न होईल तेवढीच बरी असं तिला वाटे. बिचारा अभागी जीव--विसर पडेल तेवढच बरं—असं मनोरमेला वाटत होत.

प्रकृतीला [illegible]टल्यावर सुरेंद्रनाथ आपल्या बापाबरोबर आपल्या घरीं गेला. त्याच्या सावत्र आईनं पूर्वीच्या इतकी फाजील काळजी घ्यायचं कमी केल्यामुळं सुरेंद्राला बरंच समाधान वाटूं लागलं. तरीही त्याची प्रकृति पूर्वस्थळीं येत नव्हती—अंतरांत कुठं तरी व्यथा होती. रूपयौवनाची लालूच त्याच्या मनांत अजून उदय पावली नव्हती. तसलं कांहीं त्याच्या कल्पनेतच येत नसे. पूर्वीसारखाच अजूनही तो तितकाच भ्रमिष्ट होता. स्वतःचा भार स्वतः घ्यायला असमर्थ होता. पण हा भार कुणावर टाकावा याचा पत्ता त्याला अजून लागला नव्हता.

हा पत्ता लागत नव्हता तरीही स्वतःचं काम स्वतः पहाणं त्याला मुळींच शक्य नव्हतं—आज सुद्धां तो कुणाच्या तरी तोंडाकडे पहातच स्वस्थ राही.

पण पूर्वीसारखा तो आज तितका अगदींच भ्रमिष्ट राहिला नव्हता. कुठंतरी कांहींतरी चुकतं आहे हें त्याला कळूं लागलं होतं—तळमळ सुरू झाली होती.

त्याची ही वृत्ति पाहून त्याची सावत्र आई म्हणाली, “ आजकाल आमचा सुरू अगदींच बदलेला दिसतो ! ”

मधें एक दिवशीं त्याला ताप आला. फार त्रास होऊं लागला तेव्हा त्याच्या डोळ्यांतून पाणी येऊं लागलं. सावत्र आई जवळ बसली होती. तिला हा प्रकार अगदींच अजब वाटला. पाहतां पाहतां त्याच्या डोळ्यांतून पाण्याच्या धारा वाहूं लागल्या. मोठ्या ममतेनं त्याचे डोळे पुसून ती म्हणाली, “ सुरू, काय झालं बाबा ? ”

सुरू उगीच राहिला.

त्यानंतर त्यानं एक पोष्ट कार्ड मागून घेतलं आणि वांकड्या

तिकड्या अक्षरानं पत्र लिहिलं,—' आक्का, मला ताप आला आहे. फार क्लेश होताहेत. ”

तें पत्र पोस्टांत गेलं नाहीं. आधीं त्याच्या बिछान्यावरून तें खालीं जमिनीवर पडलं—त्यानंतर बेदाण्याच्या बिया, बिस्कुटाचे तुकडे, द्राक्षांचे देठ वगैरे कचऱ्याबरोबर कुणीतरी केराबरोबर तें पत्रही उचलून फेकून दिलं. सुरेंद्रनाथाचा तो जिवाभावाचा आक्रोश धूळ खात, हवेंत उडत, दवान भिजत, उन्हानं तापत, शेवटीं एका बाभळीच्या झाडाच्या मुळाशीं पडून राहिला.

एखाद्या मूर्तिमत उत्तराच्या आशेनं पहिल्यानं तो वाट पहात राहिला होता. त्यानंतर तिचं एखादं हस्ताक्षर तरी येईल म्हणून आसावला होता. किती तरी दिवस निघून गेले पण एक बोटभर चिठ्ठीही आली नाहीं.

हळुहळू त्याचा ताप निघाला. कांहीं दिवस त्याला पथ्यावर ठेवण्यांत आलं होतं.

त्यानंतर त्याच्या जीवनांत एक नवीच घटना घडून आली. ती ती घटना नवीन होती खरी, पण अगदींच स्वाभाविक होती. सुरेंद्राचा बाप रायमहाशय किती दिवसांपासून त्याच घटनेची वाट पहात राहिला होता.

सुरेंद्राच्या आईचा बाप पाबना जिल्ह्यांतला एक मध्यम परिस्थितींतला जमीदार होता. त्याची जमीदारी वीस पंचवीस गांवांची होती. वार्षिक उत्पन्न साधारणपणें पन्नास हजारांचं होतं. आधींच तो निपुत्रिक, त्यांतूनही फारसा खर्चिक नसलेला—तसं म्हटलं तर कंजूषपणाबद्दल त्याची फार प्रख्याती होती—तो बरींच वर्षं जगला आणि अर्थातच

त्यानं संचयही भरपूर करून ठेवला. त्याच्या मृत्यूनंतर त्याची सारी संपत्ति त्याचा एकुलता एक नातु सुरेंद्रनाथ यालाच मिळणार हें रायमहाशयांना पक्कं माहित होतं.

आणि तसंच झालं. श्वशुरमहाशय आसन्नमरण झाले असल्याची बातमी रायमहाशयांना मिळाली. एकदम मुलाला घेऊन ते पावना गांवीं गेले, पण ते जाऊन पोंचायच्या पूर्वींच श्वशुरमहाशय कैलासवासी झाले होते.

मोठ्या थाटानं श्राद्धादि उत्तरक्रिया उरकल्या.

आधींच बंदिस्त असलेल्या त्या जमीदारी कारभारांत आणखी बंदिस्तपणाची अमदानी सुरू झाली. रायमहाशय म्हणजे चांगले कसलेले जुनाट वकील असल्यामुळं त्यांच्या करड्या अंमलाखालीं रयतेची त्रेधा तिरपीट उडाली.

आतां सुरेंद्र लग्न होणं अवश्य होतं. मध्यस्थांच्या येण्याजाण्यानं गांवभर दंगा माजून राहिला. पन्नास कोसांच्या टापूंत ज्या ज्या घरीं सुंदर मुलगी असल्याची बातमी लागे, त्या त्या घरीं या मध्यस्थांचं टोळकं पुनः पुनः रहदारी सुरू करून वधूच्या आईबापांना आशेचं आमिष लावीत दौरे काढूं लागले.

अशा प्रकारें चार सहा महिने सहज निघून गेले.

शेवटीं सावत्र आईची स्वारी आली. तिच्या नात्यागोत्याचे होते तेही आले. आप्त इष्टमित्रांनीं घर भरून गेलं.

त्यानंतर एके दिवशीं प्रभातकाळीं तासे, ढोल, नगारे, सनई, वाजंत्री यांच्या ढण्‌ढण्‌ खण्‌खण्‌ आवाजानं सारा गांव दणाणून सोडीत सुरेंद्रनाथ लग्न करून घरीं आला.

# ७

या नंतर पांच वर्षांचा कालावधी निघून गेला. रायमहाशय आतां हयात नव्हते--व्रजलाल लाहिरीही स्वर्गस्थ झाले होते. सुरेंद्राची सावत्र आई कैलासवासी पतिराजांनीं ठेवलेली सारी संपत्ति, पैसाअडका गोळा करून आपल्या माहेरीं निघून गेली होती.

आजकाल सुरेंद्रनाथाची जेवढी सुख्याती तेवढीच अख्याती चोहोंकडे झाली होती. कांहीं लोक म्हणत--असा मित्रवत्सल, उदार, मायाळू, आश्रिताचा प्रतिपालक जमीदार कुणी झालाच नाहीं. दुसरीकडे लोक म्हणत—असा त्रासदायक, अत्याचारी जमीदार या भागांत कधीं दिसूनही आला नाहीं.

हे दोन्ही आरोप खरे होते. पहिला आरोप सुरेंद्रनाथाच्या बाबतींत खरा होता. आणि दुसरा आरोप त्याचा मॅनेजर मथुरानाथबाबू याच्या बाबतीत खरा होता.

सुरेंद्रनाथच्या दिवाणखान्यांत आजकाल दोस्तभगत मंडळीची एकच बैठक बसलेली असे. ते लोक मोठ्या चैनींत आपल्या जिवाच्या हौशी पुरवून घेत होते. पानतंबाकु, मद्यमांस—कशाचीच कुणाला ददात नव्हती. कांहीं मागावं सुद्धां लागत नसे—आपसुकच साऱ्या गोष्टी हजर होत होत्या.

मॅनेजर मथुरबाबू या बाबतींत मोठा उत्साही होता. खर्चाच्या बाबतींत त्याचा हात अगदीं सढळ असे—कारण या खर्चाची चाट

जमीदारीच्या तिजोरीला लागत नव्हती. त्याच्या कौशल्यामुळं हा खर्चाचा भार रयतेला सहन करावा लागे. एका पैशाच्या बाबतींत सुद्धां मथुरबाबूजवळ घासघीस घालण्याची कुणाची ताकद नव्हती. घराला आग घालण, घरांतील माणसं हांकलून काढणं, कचेरींतल्या छोट्या कोठडीत त्यांना कोंडून ठेवण वगैरे बाबतींत तो मोठ्या उत्साहानं भाग घेई. या त्याच्या धाडसाला सीमा नव्हती.

बिचाऱ्या प्रजेच्या विनवण्या मधून मधून शांतीदेवीच्या कानापर्यंत पोंचत असत. ती आपल्या नवऱ्याला विनवून सांगे, "जमीदारीची व्यवस्था तुम्ही स्वत: पाहिली नाही तर सारी राखरांगोळी होऊन जाईल."

असं कांही ऐकलं की सुरेंद्रनाथ दचकून जागा होऊन म्हणे, "खरंच ते, खरंच तें, पण हे सारे आरोप खरे आहेत का?"

"खरे आहेत का म्हणजे काय? तुमच्या निंदेनं मुलखांतल्या दाही दिशा दणाणून गेल्या आहेत. तुमच्याच कानापर्यंत अजून कांहीं पोंचत नाहीं. चोवीस तास दोस्तांचं टोळकं घेऊन बसलांत तर या बातम्या तुमच्या कानीं तरी कशा पोचतील? असला हा मॅनेजर आतां पुरे झाला. आतां लाथ मारून घालवून द्या त्याला."

सुरेंद्रनाथाला मोठं दुःख होई. तो ओशाळून म्हणे, "खरंच ते. उद्यांपासून आतां मीच सारी व्यवस्था पाहतों."

मग खरोखरच जमीदारीची व्यवस्था पाहण्याच काम सुरू होई त्यामुळं मथुरानाथ अस्वस्थ होत असे. गंभीरपणाचा आव आणून तो म्हणे, "सुरेंद्रबाबू, अशानं का ही जमीदारी टिकून राहील?"

कोरडें हंसून सुरेंद्रनाथ म्हणे, "दुःखी लोकांचं रक्त शोषायचं तर असली जमीदारी हवी कशाला मथुरबाबू?"

" तर मग मला निरोप द्या. मी निघून जातों. "

अशावेळीं सुरेंद्र एकदम नरम पडे. पुनः सारं गाडं पूर्वस्थळावर येई. दिवाणखान्यांतल्या बैठकींतून सुरेंद्रनाथ बाहेर यायचा पुनः बंद होई.

अलीकडे आणखी एक नवा उपसर्ग सुरू झाला होता. बाहेर बगीच्यांत एक बंगली तयार झाली होती. तिथं कलकत्त्यांतून आलेली एलोकेशी नांवाची बाई ठाण मांडून राहिली होती. नाच गाण्यांत ती मोठी तरबेज होती. दिसायला देखील ती तशीं कांहीं वाईट नव्हती.

मधाचं पोळं झाडल्यावर बाहेर निघणाऱ्या मधमाशांप्रमाणें दिवाणखाना सोडून दोस्ताचं टोळकं या बाजूकडे झुकलं होतं. त्यांच्या आनंदाला आतां सीमा राहिली नव्हती. त्यांनीं सुरेंद्रनाथाला सुद्धां या बाजूला खेंचून आणलं.

आज तीन दिवस झाले, शांतिदेवीला नवरा दिसला सुद्धां नाहीं. चवथ्या दिवशीं तो येतांच दार बंद करून त्याला पाठ टेकून उभी राहून ती म्हणाली, " इतके दिवस होतां कुठं ? "

" बागेंतल्या बंगलींत.

" असं तीन दिवस अडकून रहाण्याजोगं तिथं आहे तरी कोण ? "

" खरंच तें—"

" प्रत्येक गोष्टींत हें ' खरंच तें ' पुरे झालं, मला सारं कांहीं कळलंय ! असं म्हणून बोलतां बोलतां तिला रडूं कोसळलं. ती म्हणत होती, " तुम्हीं असं मला लाथेनं लोटावं असा कोणता अपराध माझ्या हातून घडला आहे ? "

" असं कठं मी म्हटलं ? "

"आणखी लाथेनं लोटायचं तें काय ? बायकोच्या नजरेनं यापेक्षां आणखी दुसरी विटंबना काय व्हायची ?"

"खरंच तें. पण ते–ते–सारे लोक—"

शांतीनं त्याचे उद्गार कानीं घेतले नाहींत. आणखी अधिकाधिक रडत ती म्हणाली, "तुम्हीं माझे पति—माझं दैवत—या लोकींचं आणि परलोकींचं. मी काय तुम्हांला ओळखत नाहीं ? तुम्हांला वाटतं, मी जशी कांहीं तुमची कुणीच नव्हे. एक दिवससुद्धां कधीं तुमची आपुलकी मला लाभली नाहीं. या मनांतल्या यातना कोणत्या शब्दांनीं तुम्हांला सांगू ? मागून तुम्हांला शरम वाटेल—तुम्हांला क्लेश होतील, म्हणून आजवर कांही बोलले नव्हतें.—"

"कां रडतेस शांति ?

"कां रडते ? तें या अंतरात्म्याला माहित आहे. तुम्हीं करून सवरून माझी आबाळ करीत नाहीं हें सुद्धां मला कळतं, तुमच्याच अंतरंगांत कुठं तरी जाचणी आहे, मग तुम्हीं तरी काय करणार ?" डोळे पुसून टाकून मग ती म्हणे, "जन्मभर यातना काढाव्या लागल्या तरी मला त्याची पर्वा नाहीं. पण तुमचं हें अंतरींचं दुःख कसलं आहे ते जर मला कळलं असतं—"

सुरेंद्रनाथानं तिला जवळ ओढून घेऊन आपल्या हातानं तिचे डोळे पुसले. मोठ्या प्रेमळपणानं तो म्हणाला, "तें कळलं तर तूं काय करशील शांती ?"

ती बिचारी या प्रश्नाचं काय उत्तर देणार ? शांती फुलून फुलून रडूं लागली.

बऱ्याच वेळानं ती म्हणाली, " आजकाल तुमची प्रकृति तितकीशी चांगली नाहीं.—

" आज कां—पांच वर्षांपासून नाहीं. कलकत्त्याला गाडीखाली सांपडलो होतों, तेव्हांपासून माझी प्रकृति बिघडलेलीच आहे. ती व्यथा कांही अजून गेली नाही. अजून कसा जगून राहिलो आहे याचच केव्हां केव्हां मला आश्चर्य वाटत ! "

नवऱ्याच्या छातीवर हात ठेऊन शांती एकदम म्हणाली, " चला— पुरे झाला हा गांव. आपण कलकत्त्याला जाऊं, तिथं चांगले डॉक्टर आहेत. "

सुरेंद्र एकदम हुरळून उठला आणि म्हणाला, " चला तर. तिथं आक्का देखील आहे. "

शांती म्हणाली, " ही तुमची आक्का भेटावी म्हणून केव्हांपासून मी तळमळतें आहे. तिला घ्याल ना बोलावून ? येईल ना ती ? "

" येईल तर ! " पण थोडा वेळ विचार करून तो म्हणाला, " मी मरायला टेकलोंय असं कळलं तर खात्रीनं येईल— "

त्याच्या तोंडावर हात ठेऊन शांती चट्कन् म्हणाली, " तुमच्या पायां पडते, असलं कांहीं बोलू नका. "

" ती जर आली तर मग मला कसलीच ददात रहायची नाहीं ! "

शांतीचं हृदय मत्सरानं भरून गेलं. आपल्या नवऱ्याला वाटतं, कीं तीच काय ती एक काळजी वाहणारी !—नवऱ्याची आपण कुणीच नव्हे का ? सुरेंद्राला त्याचं कांहींच वाटलं नाहीं—तसली कांहींच जाणीव त्याला झाली नाही. आपण जे कांहीं बोललों त्यावरून तो

मोठा खूष झाला होता. तो म्हणाला, "तूं स्वतः जाऊन आक्काला घेऊन ये ! कसं ?"

शांतीनं नुसती मानेनं संमती दिली.

"ती आल्यावर तू पहाशील—मग कसलीच कांही तक्रार रहणार नाही !"

शांतीच्या डोळ्यांतून आसवांच्या धारा वाहू लागल्या.

दुसरे दिवशीं तिन दासीला बोलावून मथुरबाबूला सांगून पाठवल की बगीच्यातल्या बगळीत जिला आणल आहे तिला आत्तांच्या आत्तां घालवून देण्यांत आल नाहीं तर यापुढं मॅनेजरच्या जागेवर ठेवण्यांत येणार नाहीं. नवऱ्यालाही तिनं बजावून सांगितलं, "काय वाटेल तें होवो—तुम्ही घराच्या बाहेर गेलांत तर इथ डोकं आपटून मी जीव देईन."

"खरंच तर !—पण ते—"

"त्या 'पण' ची मी आतां सारी व्यवस्था करतें !" असं म्हणून शांतीनं पुनः दासीला बोलावून हुकूम सोडला, " दरवानाला सांग, कीं ते दळभद्रे लोक या घरांत यापुढं येतां कामा नयेत !"

दुसरा उपाय नाहीं असं पाहून मथुरबाबूनं एलोकेशीची रवानगी करून दिली. दोस्तांच्या टोळक्याची पांगापांग झाली. मनांतल्या मनांत जळफळत तो जमीदारीच्या कामाला लागला.

यावेळीं सुरेंद्रनाथाचं कलकत्त्याला जाणं झालं नाहीं. छातींतला विकार बराचसा कमी झाला होता. शांतीही कलकत्त्याला जायला ततकीशी उत्सुक नव्हती. इथच राहून शक्य तितकी नवऱ्याची सेवा करायच्या उद्योगाला ती लागली.

कलकत्त्याहून एका प्रख्यात डॉक्टराला बोलावून आणण्यांत आलं. त्यान चांगली कसोशीनं परीक्षा करून औषधाची योजना केली. आणखी असंही सांगितलं, कीं कोणत्याही प्रकारचे शारीरिक किंवा मानसिक परिश्रम केले तर ते हृदयाच्या प्रस्तुतच्या अवस्थेंत बाधक होतील.

ही संधी साधून मॅनेजरबाबूंनीं आपलं काम अशा रीतीनं करायला सुरवात केली, की त्यामुळं गांवोगांव दुप्पट हाहा:कार सुरू झाला.

मधूनमधून त्या गोष्टी शांतीच्या कानावर येत पण त्या नवऱ्याच्या कानीं घालण्याचं तिला धैर्य होत नसे.

---



व्रजबाबूच्या कलकत्त्याच्या घरीं आतां शिवचंद्र घरचा कर्ता झाला होता. माधवीच्या ऐवजी नवी वधू गृहणी होऊन बसली होती. माधवी अजूनही तिथंच होती. तिचा भाऊ शिवचंद्र तिला प्रेमळ-पणान वागवीत असे खरा पण आतां माधवीचं मन त्या घरांत लागत नव्हतं.

घरांतले दासदासी, कारकुन गुमास्ते अजुनही 'आक्का' म्हणत होते; पण सर्वांना आतां कळून चुकलं होतं, कीं आतां तिजोरीची चावी निराळ्याच व्यक्तीच्या हातीं गेली आहे.

असं जरी होतं तरी शिवचंद्राची बायको माधवीची अवज्ञा करीत नसे कीं अमर्यादाही करीत नसे. तिच्या वागण्याचा रोख अशा प्रकारचा होता; कीं आपल्या संमतीशिवाय कोणतीच कामं झालेलीं आपल्याला आवडणार नाहींत याची जाणीव माधवीला चांगल्या रीतीनं व्हावी.

त्यावेळीं बापाची कारकीर्द होती —आतां भावाची कारकीर्द सुरू झाली होती. अर्थातच पूर्वीच्या परिस्थितींत बराच बदल झाला होता.

पूर्वीं आदर होता—वात्सल्य होतं,—आतां आदर होता पण वात्सल्य नव्हतं. बापाच्या आमदानींत ती सर्वाधिकारी होती. आतां नुसती मोठ्या कुटुंबांतील ती एकजण होऊन बसली होती. शिवचंद्र किंवा त्याची बायको यांना दोष देणं इष्ट नव्हतं.

आडवळणानं त्या दोघांची निंदा करून सरळ सरळ सांगायचं इथं टाळलं जात आहे असं कुणाला वाटेल तर ती त्याची चूक आहे. ही जगाची रहाटी आहे. जी रीति किंवा नीति आजपर्यंत चालत आलेली आहे तिचाच इथं उल्लेख करण्यांत आला आहे.

माधवीच्या माथीं आभाळ कोसळल होतं. आपल म्हणायला तिला कुणी नव्हत म्हणून इतरांनीं स्वतःचा आपलेपणा कां सोडावा? नवऱ्याच्या मिळकतीवर अधिकार बायकोचा असतो हे काय कुणाला माहित नाही? शिवचंद्राच्या बायकोला काय एवढसुद्धां कळत नव्हत? शिवचद्र माधवीचा भाऊ खरा, पण ती माधवीची कोण? परक्यासाठी तिनं स्वतःचा अधिकार कां सोडून द्यावा?

माधवीला हे कांहीं सारं कळत होतं. वधू जेव्हां लहान होती तेव्हां व्रजबाबू हयात होते. त्यावेळीं माधवीच्या हिशेबी प्रमिला आणि ती या दोघांत भेदभाव नव्हता.

आतां सारा जमाना बदलला होता. ती पूर्वींपासूनच मोठी मानी होती म्हणून तिची जागा सर्वांच्या शेवटीं गेली होती. कुणाचं बोलणं सहन करणं तिला कठीण जाई म्हणूनच ती कांहीं बोलत नसे. जिथं आपली सत्ता नाही तिथं वर मान करून चालू लागल तर डोक्याला फटका बसतो हे तिला कळत होतं. मनाला वाईट वाटलं तर ती तें मुकाट्यान सहन करी—शिवचंद्राला कांहींच सांगत नसे. ओढून ताणून माया जोडणं तिला अवगत नव्हतं. म्हणून आपुलकीची जिल्हई देऊन स्वतःची सत्ता शाबीत करायचा प्रयत्न करण तिला कठीण जाई. इतर चार बायकांप्रमाणें तंटेभांडण करण्याचा तिला किती तिटकारा होता हे तिची तीच जाणत होती.

एके दिवशीं शिवचंद्राला बोलावून ती म्हणाली, " दादा, मी सासरीं जाते. "

शिवचद्र आश्चर्यचकित होऊन म्हणाला, " याचा अर्थ काय माधवी ? तिथं कोण आहे तुझ ? "

आपल्या मृतपतीचा उल्लेख करून माधवी म्हणाली, " त्यांचा धाकटा भाचा काशीक्षेत्रीं वन्सच्या जवळ आहे. त्याला गोलागांवीं घेऊन गेलें म्हणजे सारं कांही ठीक होईल. "

पाबना जिल्ह्यांतल्या गोलांगांवीं माधवीच सासर होतं.

शिवचद्र उगीच थोड हसून म्हणाला, " असं कधीं झालंय ? तिथं फार क्लेश होतील तुला ! "

" क्लेश कसले व्हायचे दादा ? अजून घर कांहीं पडून गेलं नाहीं. दहापांच बिघे जमीनजिराईत आहे. तेवढ्यावर एका विधवेचं काय चालायचं नाहीं ? "

" चालायचा प्रश्न नाहीं. अडचण आहे ती पैशाची नव्हे—पण त्या तिथं तुला फार क्लेश होतील. "

" क्लेशांच मला कांहीं वाटत नाहीं. "

विचार करून शिवचंद्र म्हणाला, " पण कां जातेस आक्का ? मला सारं कांही उघड उघड सांग—मी मिटवामिटव करून टाकतों ! "

यापूर्वी शिवचद्राला आपल्या बायकोकडून बहिणीच्या विरुद्ध कांहींतरी तक्रारी ऐकूं आल्या असाव्या. आणि यावेळीं त्याला त्याच आठवल्या असाव्या !

त्याचे ते उद्गार ऐकून माधवीची मुद्रा कावरीबावरी झाली. ती

म्हणाली, " तुला काय वाटतं दादा ? मी तंटाभांडण करून तुझ्या घरांतून जातें आहें असं का तुला वाटल ? "

शिवचद्र ओशाळला आणि एकदम म्हणाला, " नाहीं नाहीं, तसं नव्हे. माझ्या बोलण्याचा तसा उद्देश नव्हता. पण हे तुझं सत्तेचं घर आहे, मग आजच जायला निघालीस कां ? "

दोघांच्याही हृदयांत प्रेमळ पित्याची आठवण एकाच वेळीं जागी झाली. दोघांच्याही डोळ्यांना पाणी आलं.

डोळे पुसून माधवी म्हणाली, " पुन्हां येईन परत. तुझ्या मुलाची ज्यावेळी मुंज होईल तेव्हां मला घेऊन ये. यावेळीं मला जाऊं दे. "

" त्याला अजून आठ दहा वर्षं आहेत. "

" जगलें वाचलें तर येईन त्यावेळीं. "

कांहीं केल्या माधवी राहायला तयार होईना. ती जायच्या तयारीला लागली. नव्या गृहिणीला घरसंसाराच्या साऱ्या गोष्टी तिनं समजावून दिल्या. दासदासींना बोलावून आशिर्वाद दिले.

निघायच्या दिवशीं शिवचंद्र भरल्या डोळ्यांनीं बहिणीपाशीं आला आणि म्हणाला, " माधवी, तुझा दादा तर कधीं तुला टाकून बोलला नाहीं ना ? "

माधवी हंसली आणि म्हणाली, " हें काय बोलतोस दादा ? "

" तसं नव्हे—केव्हां एकाद्यावेळीं चुकून माकून—अगदीं नकळत, माझ्या तोंडून कांहीं—"

" नाहीं दादा, तसलं कांहींच नाहीं. "

" खरं ना हें ?

" अगदीं खरं. "

"तर मग जा. स्वतःच्या घरीं जायला मी आतां तुला आड येणार नाहीं. जिथं तुला बरं वाटेल तिथं रहा—तरीपण वारंवार पत्र पाठवायला विसरूं नकोस."

माधवी पहिल्यान काशीक्षेत्रीं गेली. तिथून भाच्याला बरोबर घेऊन त्याचा हात धरून गोलागांवीं आलीं—सात वर्षांच्या कालावधीनंतर तिनं आपल्या नवऱ्याच्या घरीं पुनः पाऊल टाकलं.

त्यावेळीं गोलागांवचे चतर्जी महाशय मोठ्या पेचांत आले होते. माधवीचा नवरा योगेंद्र याचा बाप आणि चतर्जी महाशय हे दोघे मोठे दोस्त होते. म्हणून मरतांना योगेंद्रानं जी कांहीं आपली जमीनवाडी होती ती त्यांच्या हातीं सोंपवली होती. योगेंद्र हयात असतांना सुद्धां सारी व्यवस्था तेच पहात असत. त्या बाबतींत स्वतः योगेंद्र फारसं लक्ष घालीत नसे.

सासरा संपन्न असल्यामुळं बापाच्या मालकीच्या या अल्पस्वल्प जमीनवाडीची त्याला फारशी पर्वा नव्हती. अर्थात् त्याच्या मृत्युनंतर चतर्जी महाशयांनीं ती जमीन बिनतक्रार आपल्या भोगवटयाला घेतली ती अगदीं न्याय्य अधिकारानं.

आतां ही विधवा माधवी फिरून घरीं आली आणि नीट बसवलेली घटी विस्कटायला सुरवात झाली. हा मोठा अन्याय होतो आहे असं चतर्जी महाशयांना वाटलं. मुद्दाम त्रास देण्यासाठीच माधवीनं ही सुरवात केली आहे असा त्यांचा ठाम समज झाला होता.

अगदीं चिडून येऊन चतर्जी महाशय म्हणाले, "असं पहा सूनबाई, तुझी जी कांहीं चार दोन बिघे जमीन आहे तिचा दहा वर्षांचा खंड थकला आहे. व्याजासकट शंभर रुपये अजून बाकी

आहेत. ते जर दिले नाहींत तर जमिनीचा लीलांव व्हायचा प्रसंग आला आहे. "

आपला भाचा सतोषकुमार याच्याकरवी माधवीनं त्यांना सांगितलं, "पैशाची काळजी नको—" असं म्हणून तिन शंभर रुपये बाहेर पाठवून दिले. अर्थातच ही रक्कम चतर्जीमहाशहांच्या पोतडीच्या भलत्याच कप्प्यांत गेली.

इतक्या सहज हें प्रकरण मिटूं देण्याइतकी माधवी कच्ची नव्हती. तिनं सतोषकरवीं सांगून पाठविलं, "दोन बिघे जमिनीवर माझ्या सासऱ्याचा चरितार्थ चालत होता. असं कांहीं मला वाटत नाहीं. आणखी कांहींतरी जमीनजुमला असला पाहिजे. तो कुठं आहे? कुणाच्या ताब्यांत आहे?"

तो निरोप ऐकून चतर्जीमहाशय रागानं भडकून उठले. ते जातीनं येऊन म्हणाले, "त्यांतली कांहीं जमीन विकली गेली आहे आणि कांहीं गहाण पडली आहे. जमिनीचा खंड गेल्या आठ दहा वर्षांत जमीदाराला दिला नाहीं तर जमीनजुमला हातीं रहाणार कसा?"

माधवी म्हणाली, "एवढा खंड द्यायचा राहिला. तें जमिनींचं कांहीं उत्पन्नच का मिळाल नाहीं? आणि जमीन जर खरोखरच विकली गेली असेल तर ती विकली कुणी? कुणाला विकली? कुणाच्या ताब्यांत आहे हे कळलं तर ती सोडवायचा प्रयत्न करतां येईल. ते कागदपत्र कुठं आहेत?"

चतर्जी महाशयांनीं अर्थात् या प्रश्नाचं सविस्तर उत्तर दिलं पण तें माधवीला कांहींच उमजलं नाहीं. किडबिड करीत ब्राह्मण कांहीं तरी बडबडत होता.

ती बडबड संपल्यावर छत्री उघडून जपमाळ कनवटीला खोवून ते बाहेर निघाले. कापडाचं एक ठाण एका पंचांत बांधून घेऊन जमीदार-बाबूची कचेरी असलेल्या लालतागांवाकडे त्यांनीं कूच केलं.

याच लालतागांवीं सुरेंद्रनाथ रहात होता आणि मॅनेजर मथुराबाबूची कचेरीही तिथच होती. आठदहा कोस पायपीट करीत ब्राह्मण एकदाचा मथुराबाबूपाशीं आला आणि त्यानं एकदम रडायला सुरवात केली. तो म्हणाला, " काय सांगू मायबाप, आतां या गरीब ब्राह्मणाला दारोदार भीक मागून जगायचा प्रसंग आला आहे. "

असे किती तरी लोक असेच येत असत! तोंड फिरवून मथुरबाबू म्हणाले, " काय झालंय ? "

" आतां तुम्हींच माझी बाजू राखा मायबाप. "

" काय झालंय तुझं ? "

माधवीनं दिलेले शंभर रुपये विनू चतर्जीनं दक्षणा म्हणून मॅनेजरच्या हातीं ठेवले आणि म्हटलं, " आपण धर्मावतार, आपण राखण दिली नाहीं तर माझं सर्वस्व जाणार ! "

" ठीक आहे. आतां सांग सारं उघड करून. "

" गोलागांवच्या रामतनू सान्यालची विधवा सून इतक्या दिवसांनीं कुठूनतरी आली आहे—माझं सर्वस्व गिळंकृत करायचा तिचा बेत आहे. "

मथुरबाबू हंसले आणि म्हणाले, " ती तुझं सर्वस्व गिळंकृत करणार आहे कीं तूंच तिचं सर्वस्व गिळंकृत करून बसलाहेस ?—सांग ना काय तें ?

हातांत जानवं धरून ब्राह्मणानं मॅनेजरचा हात कडकडून धरला

आणि म्हटलं " गेलीं दहा वर्षं जमिनीचा खंड मी भरीत आलों आहे—"

" जमिनीचा भोगवटा करायचा, मग त्याचा खंड भरायला नको ? "

" ऐकून घ्या मायबाप—"

त्याचा मतलब मथुरबाबूला कळून आला होता. तो म्हणाला, " विधवेच्या हातावर तुरी द्यायच्या आहेत वाटत ? "

ब्राह्मण मुकाट्यानं त्याच्या तोंडाकडे पहात राहिला.

" किती बिघे जमीन आहे ? "

" पचवीस बिघे. "

मथुरानाथानं हिशेब करून पाहिला आणि म्हटल, " निदान तीन हजार होतील. जमीदारीच्या कचेरीला किती सलामी देणार ? "

" जसा हुकूम होईल तितकी—तीनशे रुपये ! "

" तीनशे रुपये देऊन तीन हजार रुपये पचवणार तू ? माझ्या-कडून कांही व्हायचं नाहीं !

कोरड्या डोळ्यातून पाणी बाहेर काढीत ब्राह्मण म्हणाला, " किती रुपयांचा हुकूम आहे ?

" एक हजार देशील ? "

त्यानंतर दोघेही किती तरी वेळ खलबत करीत होते. शेवटीं निष्कर्ष निघाला तो असा—योगेंद्रनाथाच्या विधवेवर थकलेल्या खंडाची बाकी आणि दहा वर्षांचं व्याज मिळून दीड हजारांचा दावा मांडण्यांत आला. समन्स निघाल, पण माधवीच्या हातीं पोंचलं नाही, एकतर्फी डिक्री होऊन गेली. दीड महिन्यानंतर माधवीला कळवण्यांत आलं, कीं थकलेल्या खंडाच्या पायीं जमीदारसरकार-

कढून तिच्या घरादाराचं लिलांव करण्यांत आलं आहे आणि तिची सारी मिळकत जप्त झाली आहे.

शेजारणीला बोलावून माधवीन म्हटलं, "हा तुमचा देश आहे कीं दरोडेखोरांचा अड्डा आहे?"

"असं का म्हणतेस?"

"तर काय म्हणूं? मला फसवून एकजण माझं सर्वस्व हिरावून घेतो आहे तें तुम्हां लोकांना दिसत नाहीं का?"

शेजारीण म्हणाली, "आम्ही काय करणार? जमीनदारानं लिलांव केलं—आम्ही निराधार लोक—आम्हीं काय करणार तिथं?"

"झालं तें झालं—पण माझं घरदार लिलांव करण्यांत येणार याची बातमीसुद्धां मला मिळू नये! कसला हा तुमचा जमीदार?"

सारी हकीकत तपशीलवार सांगून ती म्हणाली, "असला जुलमी जमीदार—असला अत्याचारी धनी या देशांत यापूर्वी कुणी पाहिला नसेल—"

ती शेजारीण आणखीही पुष्कळ हकीकत सांगत होती. निरनिराळे लोक जे जें कांहीं बोलत आणि जें जें तिच्या कानी आलं होत तें सारं तिनं तिला सांगितलं.

माधवी घाबरीघुबरी होऊन म्हणाली, "स्वतः जाऊन जमीदारबाबूंना भेटलं तर कसं काय होईल?"

आपला भाचा संतोषकुमार याच्यासाठीं माधवीची तसही करायची तयारी होती. शेजारीण त्यावेळीं कांहीं सांगू शकली नाहीं. आपल्या भाच्याला विचारून मग कसं काय कराव तें सांगेन असं तिन सांगितलं. तिचा भाचा दोन तीन वेळ लालतागांवीं गेला होता.

जमीदार सरकारच्या कितीतरी गोष्टी त्याला माहित होत्या. बगीच्यां-तल्या बगलींत आणलेल्या एलोकेशीच्या हकीकतीपर्यंत साऱ्या गोष्टी तो ऐकून आला होता. रामतनूबाबूंच्या विधवा सुनेनं जमीदाराला भेटाव कीं नाहीं हे जेव्हां तिनं त्याला विचारल त्यावेळी तो मुद्रा शक्य तितकी गंभीर करून म्हणाला, " या विधवा सुनेचं वय काय आहे ?

शेजारीण म्हणाली, " असतील वीस एकवीस वर्षं. "

त्यान पुन्हां विचारलं, " दिसायला कशी काय आहे ? "

शेजारीण म्हणाली, " अगदीं परीसारखी. "

तेव्हां तो तोंड वांकडं करून म्हणाला, " भेटायला गेली तर काम होईल पण मला विचारलं तर मी सांगेन–तिन आजच्या आज रात्रीं होडी करून आपल्या बापाच्या घरीं निघून जावं ! "

" तें कां ? "

" आतां काय म्हटलंत ?—दिसायला परीसारखी आहे म्हणून ? "

" कां ?—त्यांत काय आहे ? "

" त्यांतच आहे सारं कांहीं. दिसायला सुंदर असली तर जमीदार सुरेंद्ररायच्या तावडींतून सुटणं कठीण. "

शेजारीण गालावर हात ठेवून म्हणाली, " म्हणतोस काय ? असं आहे ! "

तो हळुच हंसून म्हणाला, " हो, असंच आहे. साऱ्या जहा-गिरीला माहित आहे हे. "

" तर मग भेटणं बरं नव्हे म्हणतोस ? "

" मुळींच नाहीं. "

" पण सारी मालमिळकत जाईल ती ! "

" चतर्जी महाशयांचा ज्या अर्थी या प्रकरणांत हात आहे त्या अर्थी मिळकतीची आशा नको. गृहस्थाघरची बायको—वर तिन आणखी अब्रूसुद्धां घालवून बसायचं का ? "

दुसऱ्या दिवशीं तिनं येऊन माधवीला सारी हकीकत सांगितली. ती ऐकून ती स्तंभित झाली. सारा दिवस ती जमीदार सुरेंद्र रायच्या या गोष्टीसंबंधीं विचार करीत होती.

माधवीला आठवण झाली—सुरेंद्र राय ! नांव तर ओळखीचं दिसतं !—पण त्या माणसाच्या स्वभावाशीं जुळत नाही. किती तरी दिवस मनांतल्या मनांत हे नांव ती आठवीत होती.

ती विसरली होती. पांच वर्षं होऊन गेलीं होतीं. फार दिवसांनीं आतां आठवलं.

झोंपेत—स्वप्नांतसुद्धां माधवीला ती रात्र मोठी भयानक वाटली. जुन्या हकीकती पुनः पुनः आठवत होत्या—पुनः पुनः डोळ्यावाटे आसवं पाझरत होतीं.

तिची ती विलक्षण मुद्रा पाहून संतोषकुमार भयभीत झाला आणि म्हणाला, " काकू, मी आईकडे जातों. "

स्वत: माधवीला सुद्धां केव्हां केव्हां असंच वाटत होतं--इथलं घरदार गेलं, आतां काशीवास करण्याखेरीज दुसरा उपाय राहिला नव्हता. जमींदाराला भेटावं असं जें तिला वाटत होतं तें संतोषच्या कल्याणासाठीं. पण तें आता शक्य नव्हतं. शेजारीपाजारी नको म्हणत होते.

त्याशिवाय आतां एक नवा उपसर्ग सुरू झाला होता.

कुठंही गेलं तरी ही नवी भावना आडवी येत होती—हे रूपयौवन जिथं तिथं नडत होतं. माधवीला वाटत होतं, काय म्हणावं या नशिबाला ! हे संकट या देहाचा आतां जन्मभर पाठपुरावा करणार ! आज सात वर्षं झालीं, असलं कांहीं तिला समजून आलं नव्हतं— तसं समजून द्यायला कुणीं नव्हतंच. नवऱ्याच्या मृत्यूनंतर ती माहेरीं गेली तेव्हां सारेच तिला "आक्का" म्हणून हांक मारीत होते, "माताजी" म्हणून हांक मारीत होते. सर्वांनीच अशी मानाची हांक मारल्यामुळं तिचं मन अधिकाधिक वृद्ध होत गेलं होतं.

आग लागो या रूपयौवनाला !

आक्का म्हणून जिथं ती वावरत होती, आईच्या जिव्हाळ्यानं जिथं ती सर्वांना वागवीत होती, तिथं असल्या गोष्टी मनांत येणं शक्य नव्हत्या.

पूर्वी मनांत आलं नव्हतं--आतां मनांत आलं--म्हणूनच ही भावना जाणवू लागली !—विशेषतः हा यौवनाचा उल्लेख ! तिला शरम वाटली. अगदी केविलवाणे हसून ती उद्गारली, "हे इथले लोक आंधळे आहेत कीं पशू आहेत. ?"

पण माधवीचा समज चुकीचा होता—सर्वांचींच मनं कांहीं एकवीस बावीसाव्या वर्षी म्हातारीं होत नसतात.

यानंतर तीन दिवसांनीं ज्या वेळीं जमीदाराचा शिपाई येऊन दारावर बैठक मारून बसला आणि आरडाओरड करून गांवकऱ्यांना जाणवून देऊं लागला, कीं सुरेंद्रराय याची कीर्ति नव्या कलांनीं वाढते आहे, त्यावेळीं माधवी संतोषला हातीं घेऊन दासीला पुढं घालून होडी करून निघाली.

घराच्या जवळच नदी होती. सोमरापुरला जायचं असं तिनं होडीवाल्याला सांगितलं. एकदां प्रमिलेला भेटून जावं असं तिला वाटलं.

गोलागांवापासून पंधरा कोसावर असलेल्या सोमरापूर गांवीं प्रमिलेला दिली होती. तिला सासरीं जाऊन आज एक वर्ष झालं होतं. कदाचित् ती इतक्यांत कलकत्त्याला गेली असती—मग माधवीची आणि तिची भेट कशी होणार होती ? म्हणून ती भेटायला निघाली होती.

सकाळींच सूर्योदयाबरोबर होडीवाल्यांनीं होडी सोडली. पाण्याच्या उतरत्या स्रोताबरोबर होडी चालू झाली. वारा अनुकूल नव्हता म्हणून होडी हळुहळू चालली होती. कळकीच्या बेटांतून, वेताच्या झोंपांतून कांटेकुटे चुकवून, छोट्या झुडपांना बाजूला सारीत होडी हळुहळू जात होती. संतोषकुमार अगदीं खुषींत आला होता. होडीतल्या छपराखालून हात बाहेर काढून झुडपांच्या डहाळ्या पकडायचा तो प्रयत्न करीत होता.

होडीवाले म्हणाले, “ हा उलटा वारा थांबला नाहीं तर उद्यां दुपारपर्यंत होडी सोमरापुरला पोचायची नाही ”

माधवीला आज एकादशी होती. पण संतोषकुमारासाठी कुठं तरी तीन धोंडे मांडून जेवण रांधून वाढलं पाहिजे होतं.

होडीवाला म्हणाला, “ दिस्तेपाडाच्या घाटावर होडी बांधली तर ठीक जमेल. तिथ सारे जिन्नस मिळतील. ”

दासी म्हणाली, “ मग तसंच कर बाबा. दहा अकरापर्यंत तरी पोराला चार घास घातले पाहिजेत—”

---

# ९

कार्तिक महिना संपत आला होता. थंडी पडायला सुरवात झाली होती. सुरेंद्रनाथच्या घराच्या दुसऱ्या मजल्यावरच्या खिडकींतून येणारीं सकाळच्या सूर्याचीं किरणं मोठीं गोड वाटत होतीं.

बऱ्याचशा कीर्द-खतावण्या आणि कागदपत्र घेऊन सुरेंद्रनाथ खिडकीजवळच्या टेबलाच्या एका बाजूला बसला होता. जमाखर्च, वसुलबाकी, आवकजावक, बंदोबस्त, मामलामुकदमा, खतंपत्रं, सारीं एकेक उलटून पहात होता.

एका अर्थी हे सारे कागदपत्र तपासणं अवश्य होतं. तसं पाहिलं तर वेळ घालवायला त्याला दुसरं साधन तरी काय होतं ? शांती-बरोबर या बाबतींत त्याचा राच झगडा होत असे. अशा प्रकृतींत काम करूं नये असं तिनं म्हटल म्हणजे तो तिची समजूत घालण्या-साठीं म्हणे, " अक्षराकडे पहात राहिलं कीं माणसाच्या छातींतली व्यथा वाढत नाही—मग त्याला एकदम धरून उचलून बाहेर न्यायची जरुरी पडत नाहीं ! "

शांतीला त्याचं तें म्हणणं पटे आणि जरूर तर ती त्याला या कामीं मदत सुद्धां करी.

आजकाल नवऱ्यावर तिची सत्ता पुरेपूर शाबित झाली होती. तिचा एकसुद्धां शब्द अमान्य होत नव्हता. तसं म्हटलं तर पूर्वीदेखील तसं झालं नव्हतं. केवळ चारपांच दळभद्रे टोळभैरव गोळा झाल्यामुळं कांहीं दिवसपर्यंत शांतीला उगीच त्रास झाला होता.

बायकोच्या हुकमान्वयें आतां सुरेंद्राला घराच्या बाहेर पाऊल टाकायची सुद्धां बंदी होती. डॉक्टरसाहेबांच्या उपदेशानुसार शांति अगदीं जीव तोडून सारी व्यवस्था ठीकठाक ठेवीत होती.

बाजूला बसून शांति कागदाचीं बंडलं तांबड्या फितीनं बांधून ठेवीत होती तोंच एक कागद पहात असतांना वळून पाहून सुरेंद्रनाथनं तिला हांक मारली, " शांति ! "

शांति तितक्यांत कुठ गेली होती. थोड्या वेळानं आली तेव्हां म्हणाली, " मला हांक मारली ? "

" हो मला एकदां कचेरींत जाऊन यायचंय. "

" नाहीं. काय हवं तें मला सांगा. मी आणून देतें. "

" कांहीं नको. एकदां मथुराबाबूला भेटल पाहिजे. "

" त्यांना बोलवायला पाठवतें—तेवढयासाठीं कांहीं जायला नको. पण यावेळीं काय आहे त्यांचं काम ? "

" मार्गशीर्ष महिन्यापासून त्याला नोकरीवरून दूर केलंय म्हणून सांग. "

शांति आश्चर्यचकित झाली—पण खूष होऊन म्हणाली, " काय केलं त्यांनीं ? "

" त्यानं काय गुन्हा केला तें यावेळीं मला नीटस सांगतां यायचं नाहीं पण बरीच भानगड झालेली दिसतेय. "

त्यानंतर कोर्टाचं सर्टिफिकेट आणि बरेचसे कागदपत्र तिला दाखवून तो म्हणाला, " हे पहा, गोलागांवच्या एका विधवेचं घरदार बनामी लिलावानं त्यानं खरेदी करून घेतलं आहे. मला मुळीं सुद्धां विचारलं नाहीं. "

शांति कळवळून म्हणाली, " अरेरे ! बिचारी विधवा ! हे कांहीं बरं झालं नाहीं. पण ही विक्री कां झाली ? "

" दहा वर्षांचा वसूल थकला होता ! व्याज मुद्दल मिळून दीड हजारांचा दावा झाला होता. "

पैशाची गोष्ट निघतांच मथुरानाथच्या प्रकरणीं शांती जरा नरमाईला आली. उगीच थोडंस हसून ती म्हणाली, " मग त्यांत मॅनेजरचा दोष काय ? एवढी मोठी रक्कम कां म्हणून सोडायची ? "

सुरेंद्रनाथ भ्रमिष्टासारखा आपल्याशींच विचार करीत होता. शांतीनं पुनः प्रश्न केला, " एवढे पैसे उगीच कां सोडायचे ? "

" सोडायचे नाही तर काय ? निराधार विधवेला घराबाहेर का काढायची ? तुझं काय म्हणण आहे ? "

या उद्गारांत जी शब्दाची खोंच होती ती शांतीच्या मर्माला जाऊन झोंबल्यावांचून राहिली नाही. ती ओशाळली आणि दुखावल्या मनानं म्हणाली, " नाहीं घराबाहेर काढाव अस मी म्हणत नाहीं. तुमचे पैसे तुम्हीं कुणाला देऊन टाकले तर मी कां नको म्हणू ?

सुरेंद्र हसून म्हणाला, " तसं नव्हे शांती, माझे पैसे ते तुझे नव्हेत का ? पण तूंच सांग माझ्या हयातीनंतर जेव्हां तू—"

" हे काय बोलणं—"

" तूं —मला जें आवडतं ते तूं करशील ? "

शांतीच्या डोळ्याला पाणी आलं. ते शब्द तिला लागले. तिच्या नवऱ्याची प्रकृति बरी नव्हती म्हणून ते उद्गार तिला जाणवले. ती म्हणाली, " असं हें कां बोलतां तुम्हीं ? "

" बोलल म्हणजे बरं वाटतं म्हणून बोलतो, माझी इच्छा काय आहे ती एकदां कळून घेशील का शांती ? "

डोळ्याला पदर लावून तिनें मानेनें होकार दिला. क्षणभरानंतर सुरेंद्र पुन: म्हणाला, " माझ्या आक्काचं नांव ! "

डोळ्यावरचा पदर दूर करून शांतीनं सुरेंद्राच्या तोंडाकडे पाहिलं. एक कागद तिला दाखवून सुरेंद्र म्हणाला, " हे पहा—माझ्या आक्काचं नांव. "

" कुठ आहे ? "

" हे पहा—माधवी देवी—तिच्याच घरादाराच लिलांव केल. "

त्याच घटकेला शांतीला साऱ्या प्रकारचं निराकरण झालंसं वाटलं. ती म्हणाली, " म्हणूनच वाटत सारं परत द्यायच म्हणतां आहां ? "

थोडंसं हसून सुरेंद्रान उत्तर दिलं, " हो, म्हणूनच खास परत देणार आहे—सारं कांही—अगदी सारं सार ! "

माधवीच नांव निघालं तेव्हां शांतीला थोडंस दु:ख झाल. अंतरांत कुठतरी थोडीशी मत्सराची भावना डोकावली. ती म्हणाली, " ही कदाचित् तुमची आक्का नसेल. नुसतं माधवी हे नांव आहे ! नुसत्या नांवासाठीं जर— "

" आक्काच्या नांवाचा मान राखला पाहिजे ना ? "

" ते खरं—पण तिला कांही हे कळायचं नाहीं— "

" नाहीं कळणार ! पण मान राखायच माझं कर्तव्य तर बजावलं जाईल ? "

" या नांवाच्या आणखी किती तरी असतील ! "

" मी ' दुर्गा ' नांव लिहून इथं ठेवतों. त्याच्यावर पाय देशील ? "

" छे—भलतंच काय ? देवदेवतांचं नांव घेऊन— "

सुरेंद्रनाथ एकदम हंसूं लागला. तो म्हणाला, " ठीक. देवदेवतांचं नांव राहूं दे बाजूला—तूं एक काम कर. मी तुला पांच हजार रुपये देईन— "

शांती हुरळून म्हणाली, " कोणतं काम ? "

भिंतीला टांगलेली सुरेंद्रनाथाची एक तसबीर होती. तिच्याकडे बोट करून तो म्हणाला, " ही तसबीर जर— "

" काय ? "

" चार जण ब्राह्मण लावून ही तसबीर नेऊन नदीच्या कांठावर जाळशील— "

एकदम आकाशीची वीज पडलेली पाहतांच माणसाचं सारं रक्त जसं एका निमिषांत सर्द होऊन जातं, सर्पानं दंश केल्यावर माणसाचा चेहरा जसा एकदम काळानिळा पडतो, तशीच यावेळीं शांतीची अवस्था झाली.

हळुहळू पुनः चेहऱ्यावर रक्त फाकूं लागलं.—अगदीं केवीलवाण्या नजरेनं नवऱ्याच्या चेहऱ्याकडे पाहून एक शब्द सुद्धां न बोलतां ती उठली आणि निघून खालीं गेली. पुरोहिताला बोलावून रीतसर ' शांत ' करण्याची तिनं व्यवस्था केली. मनांतल्या मनांत अर्धी संपत्ती देवाला द्यायचा नवस केला. तिला वाटलं, ही आका कुणीही असो, पण हिच्या बाबतींत यापुढं एक शब्दसुद्धां काढायचा नाहीं.

आपल्या खोलींत जाऊन तिनं दार घट्ट लावून घेतलं आणि किती वेळ तरी आंसवं गाळून घेऊन तिनं एकदांचं हृदय मोकळं करून टाकलं. असला भयंकर उद्गार तिनं उभ्या आयुष्यांत कधीं ऐकला नव्हता.

सुरेंद्रनाथही बराच वेळ मुकाट्यान बसून राहिला होता—त्या नंतर तो बाहेर पडला. कचेरींत मथुराबाबूची भेट झाली. त्यानं पहिलाच प्रश्न केला, " गोलागांवांत कुणाची संपत्ती लिलांव केली ? "

" स्वर्गवासी झालेल्या रामतनु सान्यालच्या विधवा सुनेची—"

" कां ? "

दहा वर्षांची मालगुजारी शिल्लक पडली होती. "

" खातेवही पाहू. "

मथुरानाथ एकदम सर्द होऊन गेला. तितक्यांत विचार करून म्हणाला, " सारी खतपत्र अजून पाबना कोर्टांतून परत आणलीं नाहींत."

" खतपत्रं आणायला माणूस पाठवा. विधवेला राहायला जागासुद्धां राहिली नाहीं का ? "

" मला वाटतं नाही. "

" मग ती आतां राहील कुठं ? "

उसनं अवसान आणून मथुरानाथ म्हणाला, " मला वाटतं पूर्वी रहात होती तिथंच आतां राहील.

" पूर्वी कुठ रहात होती ? "

" कलकत्त्याला—आपल्या बापाच्या घरी. "

" तिच्या बापाचं नांव माहीत आहे ? "

" हो. माहित आहे. त्याचं नांव व्रजलाल लाहिरी. "

" त्या विधवेच नांव काय ? "

" माधवीदेवी. "

सुरेंद्रनाथानं मान खालीं घातली—तो मटकन् खालीं बसला. त्याच्यावर झालेला हा परिणाम पाहून मथुरानाथ घाबरून म्हणाला, " काय झालं ? "

सुरेंद्रनाथानं त्याच्या प्रश्नाचं उत्तर दिलं नाहीं, एका नोकराला बोलावून तो म्हणाला, "एक चांगला मजबूत घोडा जीन घालून आत्तांच्या आत्तां घेऊन ये. मी हा असा गोलागांवी जाणार! गोलागांव इथून किती दूर आहे ?"

"साधारण दहा कोस."

"आतां नऊ वाजले आहेत—एक वाजेपर्यंत तिथ पोंचेन, नाही का ?"

घोडा तयार होऊन येतांच तो वर बसला आणि म्हणाला, "कोणत्या बाजूला जायच ?"

"आधीं उत्तरेला जायच आणि मग पश्चिमेकडे वळायचं."

चाबकाचा फटका लगावतांच घोडा एकदम पळत सुटला.

ही बातमी कळतांच शांती देवघरांत गेली आणि रक्त येईपर्यंत देवासमोर डोकं आपटीत म्हणाली, "देवा, हेच का होत तुझ्या मनांत ? आतां फिरून भेट होईल का ?"

सुरेंद्रनाथच्या पाठोपाठ दोघां शिपायांना घोडा घेऊन गोलागांवकडे दौड करून पाठविण्यांत आल. शांती खिडकीतून पहात होती. डोळ्यांतून वाहणारीं आंसव पुशीत पुशीत ती म्हणाली, "आई दुर्गे, तुला दोन बोकड देईन—जे मागशील ते देईन—ते सुखरूप परत येऊं देत !—हृदयांतल रक्त देईन—आई दुर्गे, जेवढं तुला हवं तेवढं—तुझी रक्ताची तहान मिटेपर्यंत हव तेवढ रक्त देईन."

गोलगांवीं पोचायला अजून दोन कोसांची मजल मारली पाहिजे होती. पायाच्या खुरापर्यंत घोडा फेसाळत गेला होता. धूळ उडवीत, खड्डे ओलांडीत, दगड ठुकरावीत, जीव टाकून घोडा पळत होता. माथ्यावर ऊन तुसत जळजळत होतं.

सुरेंद्र घोड्यावर बसला होता तरीही त्याचं सर्वांग गळल्यासारखं झाल होतं. देहांतली प्रत्येक नाडी जशी कांहीं तुटून बाहेर पडूं लागली होती. धुळीन माखलेल्या त्याच्या सदऱ्यावर चार दोन रक्ताचे थेंब टप्कन् पडले. सुरेंद्रनाथान हातानं तोंड पुसलं.

एक वाजण्याच्या पूर्वी तो गोलागांवीं येऊन पोंचला. रस्त्याच्या बाजूला दुकान होतं. त्यानं दुकानदाराला विचारलं, " गोलागांव हेच का ? "

" हो. "

" रामतनु सान्यालच घर कुठ आहे ? "

" या बाजूला—"

पुनः घोडदौड सुरू झाली. थोड्याच वेळांत तो त्या घरासमोर येऊन पोंचला. दाराजवळ एक शिपाई बसला होता, धन्याला पाहतांच त्यानं मुजरा केला.

" घरांत आहे कुणी ? "

" कुणी नाहीं.

" कुणी नाहीं ? कुठ गेले. "

" पहाटे होडी करून निघून गेले. "

" कुठं ?—कोणत्या बाजूला—"

" असे दक्षिण बाजूला—"

" नदीच्या काठाकाठाला रस्ता आहे ? घोडा दौडेल असा रस्ता आहे ? "

" तें सांगतां येत नाहीं—मला वाटतं नाहीं. "

पुनः घोड्याची दौड सुरू झाली. दोन कोस मजल मारल्यावर पुढं रस्ता दिसेना. घोडाही चालेना.

घोडा सोडून देऊन सुरेंद्रनाथ पायींच पुढें निघाला. एकदां त्यानं पाहून घेतलं—आंगरख्यावर इथून तिथून रक्ताचे डाग धुळीसकट सांकळले होते. ओठाच्या दोन्ही टोकांतून रक्त वहात होतं.

तो नदींत उतरला, ओंजळ भरभरून पाणी प्याला आणि मग जीव टाकून दौडत सुटला. पायांत वहाण नाहीं--सर्वांग चिखलानं भरलेंल--मधून मधून रक्ताचे डाग--छातीवर जसं कांहीं कुणीं रक्त शिटकावलं होतं.

दिवस फिरत आला होता. पाय उचलत नव्हता. झोपायची संधि मिळाली तर मरेपर्यंत झोपेन असं त्याला वाटत होतं—या जीवनांतील मोठ्या विश्रांतीच्या आशेनं जणुं काय शेवटची शय्या पकडण्यासाठीं तो वेड्यासारखा बेफाम पळत सुटला होता. देहांत होती नव्हती तेवढी शक्ति बिनतक्रार खर्चीं घालून शेवट गांठायचा—निदानीची झोंप घ्यायची--पुनः उठायचं नाहीं--अशा भावनेनं तो पळत होता.

नदीच्या वांकणाच्या बाजूला--काय तें ?—तिथ एक होडी दिसत होती का ? भाजीपाल्याच्या झुडपांतून तो बळेंबळेच वाट काढीत होता. सुरेंद्रानं हांक फोडली, " आक्का. "

कोरड्या घशांतून शब्द बाहेर निघेना—नुसते रक्ताचे एक दोन थेंब खालीं टपकले.

" आक्का ! "--पुनः रक्ताचे दोन थेंब !

झुडपांतून रस्ता काढीत होडीपर्यंत पोंचायला कठिण जात होतं. सुरेंद्र कसाबसा जवळ येऊन पोंहचला.

त्यानं पुनः टाहो फोडला, " आक्का ! "

साऱ्या दिवसाचा उपास—त्यांतून मनाला झालेल्या क्लेशामुळं

झोंपी गेलेल्या मतोषकुमारजवळ माधवी डोळे मिटून पडली होती. तितक्यांत तिच्या कानीं हांक आली जुन्या ओळखीच्या आवाजाची ती हाक होती की नाहीं !

माधवी उठून बसली. तिन आंतून डोकावून पाहिल. सर्वांग चिखल-धुळीन माखलेला- कोण ?—मास्तरमहाशय तर नव्हे ?

" अग नयनतारेच्या आई, होडीवाल्याला साग, झट्कन होडी किनाऱ्याला लाव. "

सुरेंद्रनाथ फरपटत फरपटत नदीच्या काठावर येऊन आडवा पडला. सर्वांनी मिळून त्याला उचलून आणून होडीत ठेवला तोंडावर पाणी शिटकावून डोळे पाण्यान पुसून घेतले.

एका होडीवाल्यान त्याला ओळखल. तो म्हणाला, " हा लालता-गावचा जमीदार--" गळ्यांतला सोन्याचा हार ताईतासकट काढून माधवीन त्या होडीवाल्याच्या हातीं दिला आणि म्हटल, " आजच्या आज रात्रीं लालतागांवीं पोंहचवलस तर प्रत्येकाला असा एकेक हार देईन."

सोन्याचा हार पहातांच दोरी हातीं घेऊन त्यांतले तिघेजण खाली उतरले. ते म्हणाले, आईसाहेब, चांदणी रात्र आहे. उजाडायच्या पूर्वी हटकून पोंचवतों तुम्हांला. "

संध्याकाळीं सुरेंद्रनाथ शुद्धीवर आला, डोळे उघडून तो माधवीच्या तोंडाकडे पाहात राहिला, माधवीच्या तोंडावर यावेळी पदर ओढलेला नव्हता—पदर कपाळापर्यंत आला होता. सुरेंद्रनाथाचं मस्तक मांडीवर घेऊन माधवी बसली होती.

बराच वेळ सारखी टक लावून पाहिल्यावर सुरेंद्र म्हणाला, " तूंच का आक्का ? "

माधवीनं पदर पुढं ओढला. त्याच्या ओंठाजवळ आलेला रक्ताचा थेंब तिन हळुवार पुसून घेतला—त्याचवेळीं तिन आपले डोळेही पुसले.

" तूच का आक्का ?

" मी माधवी. "

सुरेंद्रनाथानं डोळे झाकले. तो हळुहळू पुटपुटत होता, " अं: ! खरंच तर ! "

साऱ्या विश्वांतला आराम त्या अंकावर विराजमान झाला होता. इतक्या दिवसांनतर सुरेंद्रनाथनं इच्छित वस्तूचा शोध लावला. ओंठाच्या कोपऱ्यांला हास्याच्या लकेरीबरोबरच रक्ताचे बिंदू चमकत होते.

" आक्का, मोठ्या वेदना होताहेत ग ! "

सळसळ आवाज करीत होडी चालूं लागली होती. छपराखालीं सुरेंद्रनाथाच्या तोंडावर चंद्राचे किरण पडत होते. एक मोडका पखा घेऊन नयनतारेची आई हळुहळू वारा घालीत होती.

सुरेंद्रनाथान हळुहळू विचारलं, " कुठं निघाली होतीस ? "

गहिंवरल्या कंठान माधवी उद्गारली, " प्रमिलेच्या सासुरवाडीला. "

" छे छे, कुटुंबीयांच्या घरी अशा रीतीनं का जायचं आक्का ? "

# १०

स्वत:च्या वाड्यांत—आपल्या निजायच्या खोलींत—आक्काच्या मांडीवर डोकं ठेवून सुरेंद्रनाथ मृत्यूशय्येवर पडला होता. त्याचे दोन्ही पाय हृदयाशी कवटाळून शांती आपल्या आसवांनीं न्हाणीत होती.

पाबनाला जेवढे कुणी डॉक्टर, वैद्य होते त्या सर्वांनीं शक्य तेवढे उपचार करून पाहिले पण रक्तस्राव बंद झाला नाहीं. पांच वर्षांपूर्वी झालेली जखम फुटून आतां रक्ताची झरणी लागली होती.

माधवीच्या अंतरंगांतील भावना तिला उघड करून बोलतां येईना. ती सांगतां येणं मोठं कठीण होतं. वाटतं, पांच वर्षांपूर्वीची गोष्ट तिला आठवत होती. त्यावेळीं तिनं त्याला घरांतून बाहेर घालवून दिलं होतं पुन: त्याला परत आणतां आलं नव्हतं. पांच वर्षांच्या नंतर सुरेंद्रनाथानं मात्र तिला पुन: परत आणलं.

संध्याकाळचा दिवा उजळू लागला. सुरेंद्रनाथनं माधवीच्या तोंडाकडे पाहिलं पायाजवळ शांती बसलेली होती. तिला ऐकूं येऊं नये म्हणून आपल्या हातांनं माधवींचं तोंड आपल्या तोंडाजवळ ओढून घेऊन तो म्हणाला, " आक्का, त्या दिवसाची गोष्ट आठवते का ?—त्या दिवशीं तू मला बाहेर हांकलून दिलं होतस तें ? त्याचाच हा सूड उगवला मी—तुलाही घालवून दिलं घराबाहेर—कसं ? फिटफाट झाली ना ?

त्याच क्षणाला माधवी बेशुद्ध झाली. तिचं मस्तक सुरेंद्रनाथाच्या खांद्यांवर गळून पडलं.

ज्यावेळीं ती शुद्धिवर आली त्यावेळीं घरभर रडण्याचा हलकल्लोळ ऐकूं येत हाता.

---

# ❀ आमचें प्रकाशन ❀

## नाथमाधव-माला

डॉक्टर कादंबरी ८-०-०
वीरधवल ८-०-०
" (शालेय) १-४-०
सोनेरी टोळी ५-०-०
देशमुखवाडी ५-०-०
विमलेची ग्रहदशा ३-०-०
विहगवृंद ३-०-०
सुहासिनी २-८-०
सापत्न भाव ३-८-०
हेमचंद्र रोहिणी १-८-०
सावळ्या तांडेल २-०-०
" (शालेय) १-२-०
दोन भावडें २-०-०
" (शालेय) १-०-०
मालती माधव १-८-०
ग्रहदशेचा फेरा २-०-०

### नाटकें

मराठ्यांचा आत्मयज्ञ १-८-०
जातिवंत मराठा वीर १-८-०
नेताजी पालकर २-०-०

## शरत्साहित्य-माला

श्रीकांत भाग १ ते ४ किं. अनुक्रमे रु १॥, २, २, २
देवदास व बिंदुचे बाळ ४-०-०
भारती ६-०-०
गात्रगंगा २-०-०
शुभदा ३-०-०
काशीनाथ १-८-०
माधवी १-८-०
भैरवी ३-८-०
विजया ४-०-०
चंद्रनाथ, दर्पचूर्ण, हेमांगिनी ३-०-०
चार मिनार १-८-०
विराज-वहिनी २-८-०
ब्राह्मणाची मुलगी २-०-०
विप्रदास ४-०-०
परिणीता ३-१२-०
पंडित महाशय ३-१२-०
चरित्रहीन भाग १ ला ४-०-०
" भाग २ रा ४-०-०
शेवटचा परिचय ७-०-०
नाटक शास्त्र आणि तंत्र ३-०-०

**नवभारत प्रकाशन संस्था—मुंबई नं. ४.**

# बंकिम साहित्यमाला

## संपादक : मामा वरेरकर

जानेवारी १९५४ पासून ही माला सुरू झाली असून दर महिन्याला १ याप्रमाणें आतापर्यंत ८ पुस्तके प्रसिद्ध झालीं आहेत. प्रत्येक भागाची किंमत २ रु. ठेवली आहे. परंतु हीं १२ पुस्तकें आगाऊ २० रु. भरणारांस घरपोंच पाठविण्यांत येतील. ट. ख. माफ.

१ दुर्गेशनंदिनी
५ इंदिरा
२ कपालकुंडला
६ चंद्रशेखर
३ मृणालिनी
७ रजनी
४ विषवृक्ष
८ कृष्णकांताचें मृत्युपत्र

९ राजसिंह, १० सीताराम, ११ आनंदमठ, १२ देवी चौधुराणी

## शरद्-साहित्य, संपूर्ण सेटची किं. ७३-८-०

| | | | |
|---|---|---|---|
| श्रीकान्त भाग १ ते ४ | ७-८-० | परिणीता, पंडितमहाशय प्र. | ३-१२-० |
| देवदास आणि बिंदूचें बाळ | ४-०-० | विराजवहिनी | २-८-० |
| भारती | ६-०-० | चारमिनार, माधवी, काशीनाथ प्र. | १-८-० |
| गांवगंगा, ब्राह्मणाची मुलगी प्र. | २-०-० | चरित्रहीन भाग १ ते २ प्र. | ४-०-० |
| शुभदा, चंद्रनाथ प्रत्येकीं | ३-०-० | शेवटचा परिचय | ७-०-० |
| भैरवी | ३-८-० | शेषप्रश्न | ५-०-० |
| विप्रदास, विजया प्र. | ४-०-० | | |

## नाथमाधवमाला, संपूर्ण सेटची किं. ५२-८-०

| | | | |
|---|---|---|---|
| वीरधवल, डॉक्टर कादंबरी प्र. | ८-०-० | विहंगवृंद, विमलेची गृहदशा प्र. | ३-०-० |
| सोनेरी टोळी, देशमुखवाडी प्र. | ५-०-० | हेमचंद्ररोहिणी, दोन भावंडें प्र. | २-०-० |
| स्वयंसेवक ( कादंबरी ) | ५-०-० | सुहासिनी | २-८-० |
| सांवळ्या तांडेल, ग्रहदशेचा फेरा प्रत्येकीं | २-०-० | सापत्नभाव | ३-८-० |
| | | मालतीमाधव | १-८-० |

## शालेय

| | | | |
|---|---|---|---|
| वीरधवल | १-४-० | सापत्नभाव | १-८-० |
| सांवळ्या तांडेल | ०-१४-० | देशमुखवाडी | १-८-० |
| दोन भावंडें | १-०-० | | |

आणखी इतर पुस्तकांसाठीं आमचा कॅटलॉग मागवा.

**नवभारत प्रकाशन संस्था मुंबई नं. ४**